# नारी

[ कादंबरी ]

मूळ लेखक

श्रीसियारामशरण गुप्त

चिरगाँव, झाँशी

अनुवादिका

प्रा० सौ० इन्दुमती गंधे,

एम्. ए., बी. टी., साहित्य-विशारद

धनतोली, नागपूर

१९५९

हिंदी मराठी प्रकाशन

धनवटे चेम्बर्स, सीताबर्डी, नागपूर

प्रकाशक :
हिन्दी मराठी प्रकाशन
धनवटे चेम्बर्स, सीताबर्डी,
नागपूर



मुद्रक :
बालकृष्ण शास्त्री
ज्योतिष प्रकाश प्रेस,
कालभैरव मार्ग, वाराणसी





मूल्य : तीन रु[redacted]



१ डिसेंबर १९५९

आमच्यावर पितृवत् प्रेम करून ज्यांनी आम्हाला ध्येयनिष्ठ

आणि आदर्श जीवनाचा मार्ग दाखविला व ज्यांनी

स्त्रीशिक्षणाबद्दल कळकळ दाखवून त्याचा

प्रसार केला त्या आमच्या

ती० नानास ही

( ती० नारायण विनायक भट )

जोधपूर

माझी पहिलीच कृति अत्यंत प्रेमादराने समर्पित करीत आहे.

# प्रस्तावना

श्री सियारामशरण गुप्त ह्यांच्या कुशल लेखणींतून उतरलेल्या 'नारी' ह्या गाजलेल्या हिंदी कादंबरीचा श्रीमती इंदुमती गंधे यांनी केलेला मराठी अनुवाद आज प्रसिद्ध होत आहे, ही माझ्या मतें, एक अभिनंदनीय गोष्ट आहे. भारत एक विशाल देश आहे; धर्म, पंथ, भाषा आणि लिपी ह्यांमुळे त्याच्या एकजिनसीपणांत भिंती उभारल्या जाऊन त्याच्या एकात्मतेंत व्यवधानें निर्माण झाल्यासारखीं झालीं आहेत. पण ह्या व्यवधानांच्या आड वसत असलेला ह्या देशाचा सांस्कृतिक आत्मा एकच आहे. हें समजण्यासाठी निरनिराळ्या भारतीय भाषांमधील उत्कृष्ट वाङ्मयाचें परस्पर आदान-प्रदान आवश्यक आहे. श्रीमती इंदुमती गंधे यांचा प्रस्तुतचा प्रयत्न हा अशा आदान-प्रदानाचाच एक भाग असल्याकारणाने मला तो अभिनंदनीय व स्वागतार्ह वाटतो.

सियारामशरणजी गुप्त हे, आपले बंधु मैथिलीशरण गुप्तांप्रमाणे साहित्य-सेवेला स्वतःला वाहून घेतलेले हिंदीचे एक थोर साहित्यिक आहेत. काव्याप्रमाणेच ह्यांनी कथा-वाङ्मयांचें क्षेत्रहि चागलेंच गाजविलेलें आहे. त्यांची 'नारी' ही कादंबरी, कथा-साहित्याच्या क्षेत्रांत एक उत्कृष्ट कृती म्हणून गाजलेली आहे. ग्रामीण जीवनाचें वातावरण, व त्या पार्श्वभूमीवर भारतीय स्त्रीच्या बाह्य आणि आंतरिक जीवनांत निर्माण झालेलीं आंदोलनें ह्यांचें यथातथ्य आणि हृदय-स्पर्शी चित्र आपल्याला 'नारीं'त पहावयास मिळतें.

यमुना ही ह्या कादंबरीची नायिका. गजानन नांवाच्या एका गोजिरवाण्या मुलाला जन्म देऊन त्याला तिच्या ओटींत निरवून, व

आपल्या वृद्ध माता-पित्यांचा भारहि तिच्यावरच टाकून तिचा पति गावातल्या आर्थिक परिस्थितीला कंटाळून नशीब काढण्यासाठी परागंदा झाला. आठ-दहा वर्षे झालीं तरी त्याचा कुठे पत्ता लागेना. मध्यंतरीच्या काळांत सासू-सासरेहि मृत्युमुखीं पडले. तरीहि यमुना आपल्या लाडक्या एकुलत्या एक मुलाकडे पाहून, घर सोडून निघून गेलेल्या आपल्या पतीच्या परत येण्याची वाट पाहात जीवन कंठीत होती. राहतें घर, पोटाला देणारें शेत, त्या शेतांतली विहीर, विहिरीलगत नवरा-बायकोने मोठ्या आवडीने लावलेलें अंब्याचें झाड,-सारें गावच्या पाटलाकडे गहाण पडलेलें. काबाडकष्ट करून कसेंतरी पोटाला मिळवायचें. ना कोणाची मदत, ना कोणाचा आधार. तरीहि यमुना धीराने जगत होती एकाच आशेवर,—आज ना उद्यां आपला पति घरीं परत येईल !

पण रामू नांवाच्या पाटलाच्या दुष्ट मुलाच्या कुटिल करणीमुळे तिच्या त्या आशेवरहि पाणी ओतलें गेलें. आपला पति वारला अशी तिची समजूत झाली, आणि मग तिला सर्वत्र अंधारच अंधार दिसूं लागला. त्या अंधारांत तिला मार्ग दाखविणारा प्रकाशाचा एकच किरण होता, तो म्हणजे तिचा मुलगा गजा. गावांतली दुसरीहि एक व्यक्ति होती. त्या व्यक्तिचाहि तिला वेळोवेळीं बराच उपयोग झालेला होता. ह्या केशवने अत्यंत आपुलकीने तिला अनेक संकटांत स्वतः झीज सोसून मदत केलेली होती. केशवचें हें वागणे सर्वथैव निर्हेतुक होतें असें नाही. नवरा परत येण्याची आशा सोडून यमुनेने गावरीतीला अनुसरून आपल्याशीं पाट लावावा, असें केशवला फार फार वाटत होतें. पण पुढे पुढे, यमुनेची अनन्य पतिभक्ति पाहून त्याने आपलें मन आवरलें, आणि त्याच्याकडून यमुनेवर होणाऱ्या उपकारांना एका निराळ्याच उदात्ततेची झळाळी लाभली. आपली विटंबना थांबविण्यासाठी मध्यंतरींच्या काळांत यमुनेचें मनहि द्विधा बनल्यासारखें झालें; केशवशीं आपण संसार थाटून सर्व गांजणुकींतून सुटका करून घ्यावी, असा विचार

तिच्या मनांतहि डोकावूं लागला होता. पण, तिची पतिनिष्ठा शेवटीं प्रबळ ठरली आणि तिने तो विचार सोडून दिला. अशा रीतीने, एक पतिनिष्ठ पत्नीचा, स्वार्थशून्य मातेचा सोज्ज्वळ भारतीय स्त्रीत्वाचा उज्ज्वल आदर्श यमुनेच्या रूपाने आपणांस ह्या कादंबरींत पहावयास मिळतो.

अनुवादाची भाषा अगदीं सोपी व ओघवती आहे. त्यामुळे पर-कीयत्व कुठे वाचकाला खटकत नाही. हिंदी व मराठी भाषांवर प्रभुत्व आणि मूळ हिंदी कादंबरीशीं समरस होणें हे दोन्ही गुण श्रीमती इंदुमती गंधे यांचे ठायीं असल्याकारणाने त्यांचा हा अनुवाद सरस झाला आहे. वाचक त्यांच्या अनुवादित कादंबरीचें स्वागत करतील अशी माझी खात्री आहे.

नवी रामदास पेठ,
नागपूर
दि० १–१–१९६०

शंकर बाळाजी शास्त्री

: १ :

पोस्टमनने एका पडक्या घराजवळ थाबून हाक दिली; "यमुनाबाई आहेत?"

आतून काही उत्तर आले नाही, पण घरांत कोणी तरी निश्चित आहे याची त्याला खात्री पटली. डोळ्यावरील चष्मा वर करून त्याने टपाल उलट पालट केलं आणि "हेच ते" म्हणून एक पाकीट आंत भिरकावून तो पुढे चालता झाला.

यमुना घरातील एक खोली सारवीत होती. पोस्टमनच्या आवाजाने जणूं तिच्या अंगात वीज चमकली. याच आवाजाची कित्येक वर्षांपासून प्रतीक्षा करून ती निराश झाली होती. बरींच वर्षे लोटूनही तो आवाज ओळखायला तिला यत्किंचितही वेळ लागला नाही. नव्या आशा फुलल्या. एक हाथ घागरीवर आणि दुसरा पोतेऱ्यावर तसाच राहिला. ज्या पाहुण्याच्या स्वागतासाठी ती आतुर झाली होती त्याच्याच आगमनाचा जणूं हा इशारा आहे असे तिला वाटले आणि अंगात एक गोड शिरशिरी भरली.

ती उंबरठ्यापर्यंत गेली नाही तोंच पोस्टमन दूर निघून गेला होता. शेणाने माखलेल्या हाताच्या दोन बोटांच्या टोकाने तिने हळूच ते पाकिट पाहिलें. तिचं मन म्हणालं, "किती मोठं पत्र लिहिलं आहे त्यांनी! लहानशा चिटोऱ्यावर सारं काही मावलं तर पाहिजे!" पण लागलीच तिचं अंतरमन तिला हिणवूं लागलं, "शक्य नाही! हें त्यांचे पत्र नाही. आतापर्यंत दोन ओळी लिहायची सद्बुद्धि ज्याना झाली

नाही ते काय इतकं लांबलचक पत्र लिहीणार? न लिहायला काय झालं? मनात आणलं तर सर्व काही करूं शकतात! नात्या गोत्यात त्याच्या इतकं शिकलेलं कोणी तरी आहे काय? आता मला वाचतां येत असतं तर! एकदा असाच मला शिकविण्याचा त्यानी हट्ट केला. शिकवणं कुठलं? कामातून बोलावून जवळ बसविण्यासाठी केलेलं सोंग होतं! पण मी दुर्दैवी! माझ्या कुठं होतं भाग्यात शिक्षण!

पाकीटाच्या आत काय असेल या उत्सुकतेने तिने ते हळूच दाबले. 'हे तर एखादं कॅलेंडर नाहीतर मासिक वाटंतय!' जेवढ्या प्रेमभराने तिनं ते पाकीट उचललं होतं तेवढ्याच तिरस्काराने तिने समोरच्या कोनाड्यात ते भिरकावून दिलं. ती पुन्हा आपल्या कामाला लागली. तिची विचारतंद्री चालूच होती. त्यानी जर माझं नाव टाकलं तर मी कशाला त्याची आठवण करूं? किती ठरवते की गेल्या गोष्टी विसराव्या म्हणून! पण काहीना काही प्रसंगानी पुन्हा त्याच त्या विचारात मन घोटाळतं! गजू शाळेतून आला की, त्याला विचारते, "कोठून मागवलं ते मासिक? किती पैसे पडले?"

एकदम तिच्या डोक्यात नवीन विचार आला! ती विचार करूं लागली; "कालीमातेचं कलकत्ता शहर अफाट आहे! मला चकीत करायला साऱ्या शहराचं वर्णन छापून फोटोसहित पाठवलं असेल! शहरांत गेल्यावर सर्वलोक शौकीन बनतात. तेथील लोक बाटलींतील पाणी सुद्धा पैसे देऊन पितात! हें पत्र कदाचित् त्याचेच असूं शकतें! गजू आला तर त्याच्याकडून हे वाचून घेईन!"

या एक एक विचारानी तिच्या कामात गति आली. भराभर कामें आटपून ती गजूची वाट पाहात बसली. स्वयंपाक तयार होता पण खाणाऱ्याला सुट्टी होईल तेव्हा ना! स्वयंपाक लवकर झाला म्हणून शाळा थोडीच लवकर सुटणार होती! गजू नाही तरी खेळत खेळतच घरीं येतो! नाहीतरी सायंकाळीं मुलाना भूक लागते आणि त्यामुळे त्याना लिहिण्या-वाचण्याचा कंटाळा येतो!

"आई ! ए आई !" ओरडत गजू आंत आला. एका हातात दौत, गळयात दप्तर, हात शाईने बरबटलेले; अगदी हुबेहूब शाळकरी मुलाचाच अवतार होता. चेहरा जणूं सागत होता; "चला सुट्टी झाली, आता खूप-खूप खेळायचं !"

गजू आल्याचे यमुनाने ओळखले. ती आतूनच म्हणाली, "जेवण तयार आहे ! चल लौकर पानावर !" तिने मोठ्या हौशीने आपल्या लाडक्या मुलाचे नाव "गजानन" ठेवले होते, पण त्याला लाडाने सारे गजूच म्हणत !

पोराला चागलं वळण लागावं म्हणून पति गेल्यापासून गजूच्या शिस्तीच्या बाबतींत ती जास्त कडक झाली होती. गजू पानावर आला तेव्हा ती त्याला म्हणाली,

"हातपाय धुतलेस ? आघोळ केलीस ? वेधळा कुठला !"

"तूंच तर म्हणाली लौकर ये म्हणून !"

"मग काय, आंघोळ न करताच ये म्हटलं होय !"

"नाही ग आई ! पण मला खूप भूक लागली आहे."

हे शब्द कानी पडताच यमुनेचे मातृहृदय द्रवले आणि तिने त्याला आघोळीची सूट दिली. "बरं उद्या मीच घालून देईन" अस म्हणत तिने पान वाढलं.

"भाजी नाही केलीस आई ? मला नाही आवडत नुसती वरण-पोळी ! मला भूकच नाही ! मी नाही जेवत जा !" गजू रागाने म्हणाला.

"उद्या बाजार आहे गजू ! मग तुझी आवडती बटाट्याची भाजी आणूं हं ! बघ तर, आजचं वरण खूप छान झालंय !"

"तुला कस कळलं ? तूं चव पाहिलीस ?"

यमुना गालातल्या गालांत हंसली. ती म्हणाली, "चल जेव लौकर. मी तुला एक गम्मत देणार आहे !"

गजूने ओळखण्याची शिकस्त केली. आपल्या आवडत्या पदार्थांचीं त्याने झटपट नांवें घेतलीं. 'शिरा, लाडू, पेढा !' सगळ्यावर जेव्हां आई नकार देऊं लागली तेव्हा त्याला वाटलें, याहून देखील कोणती वस्तु चांगली असेल ? कोडे ओळखण्यासाठी त्याने चौफेर नजर फिरविली. कुठेच सुगावा लागेना !

आईला पाकीट आणतांना पाहून गजूने टुणकन् उडी मारली ! "अहा आलं ! मी आजच म्हटलं, अजून कस आलं नाही ?"

यमुनेच्या क्षीण आशातन्तूंना एक झटका बसला. शंकित मनाने तिने विचारले, "तुला कस कळलं पत्र येईल म्हणून ?"

"पत्र नाही ग ते आई ! कॅलेंडर येणार याची वाट पाहात होतों मी ! मी मागच्या रविवारीच बिनातिकीटाच पत्र कॅलेंडर पाठवायसाठी लिहिलं होतं. म्हटलं आलं कलेंडर तर छानच होईल ! नाही आलं तर न येवो बिचारं !" त्यानं आईच्या हातांतून ते पाकिट हिसकलं. मोठ्या गर्वाने तो पाकीट उलथे पालथे करूं लागला ! तो आनंदाने भाबावून गेला. पाकीट कोणत्या बाजूने फोडावे हे त्याला उमगेना !

"कांही कळे न वळे; म्हणे तेंच आहे !" यमुना म्हणाली. पत्राची क्षीण आशा अजूनही तीव्रतेने तिच्या मनात डोकावीत होती.

गजूने ते मोठ्ठं पाकीट फोडलं. "किती छान आहे कॅलेंडर पाहिलंस ! हें पहा महादेवाचें चित्र ! याच्या गळयांत किती मोठ्ठा नाग आहे पाहिलंस ! बाप रे !! एका मागून एक बाराही रंगी-बेरंगी चित्रें त्याने आईला दाखविलीं. तीं पाहून आईला कांहीच कसा आनंद होत नाही हें मात्र गजूला कळेना ! किती दुरून हें कॅलेंडर बोलावलं आपण ! आणि पुन्हा एक पै देखील खर्च पडला नाही ! वर्गात माधवशिवाय कोणाही मुलाजवळ ही जम्मत नाही !"

तरीपण आई नाखुष कां बरं ? तिने एकदासुद्धा हातांत घेऊन नीट पाहिलं नाही ! जेवण अर्धवट सोडून तो तसाच उठला होता. कॅलेंडर

पाहून त्याचं पोट भरून गेलं होतं. त्याला असं झालं, केव्हा एकदा सकाळ उजाडते आणि आपण शाळेत मित्राना कॅलेंडर दाखवितो !

दुसऱ्या दिवशीं आंघोळ करायला बसल्यावर गजू विचाराच्या तंद्रित पाणी गार झालं हेंही विसरला. एरवी जरासं कोमट पाणी झालं की केवढा ओरडा करायचा तो ! आंग पुसून गजू पानावर आला. त्याने भराभर चार घास कोंबले ! आज तो आईला, 'तूं बैसना माझ्याबरोबर' असे म्हणायला पण विसरला होता. गजू मित्राकडे गेला अन् यमुना आज एकटीच राहिली होती. अति विचारात ती जेवणसुद्धा विसरली होती. यमुनेला हे विरहाचं दुःख कांही नवे नव्हते. ते फुफाट्यासारखे मधेच एखादी प्रज्वलित करणारी वस्तु पडताच प्रज्वलित व्हायचं !

सारा दिवस तिचा, विचारात गेला ! ती सुन्नपणे बसून होती. दिवे लागणीची वेळ केव्हा झाली हे तिला कळलंही नाही.

"आई, आईग ! दिवा नाही लावलास ?"

गजूचा आवाज ऐकून ती एकदम भानावर आली.

"हो लावतेच आता !" असे म्हणून ती एकदम उभी राहिली. गजूने उजेडात पाहिलं ! स्वयंपाकघरात चुलीशीं अन्नाचीं भाडीं जशीच्या तशींच झाकलेलीं त्याला दिसलीं.

"आई ! तूं जेवली नाहीस दुपारीं ?"

"हो रे ! गजू ! इच्छा नव्हती जेवायची ! आता रात्रीं तुझ्या बरोबर जेवीन !" हे शब्द उच्चारताच यमुनेला मागच्या एका प्रसगाची आठवण झाली.

एकदा असेच थोड्याशा बाचाबाचीनंतर ती माजघरांत न जेवता पडून राहिली होती. विनायक वडिलाचा डोळा चुकवून माजघरांत येरझारा घालीत होता अन् जेवायचा आग्रह करीत होता. आज कोण तिची विनवणी करायला येणार !

जेवणानंतर पुन्हा गजू ते कॅलेंडर घेऊन तिच्याजवळ बसला. तो एकदम म्हणाला, "ओळख हें चित्र कोणाचं आहे?"

चित्र पहाताच तिचा चेहरा नकळत फुलला! ती एकदम म्हणाली "हें तर रामाचं चित्र आहे. ही सीता अन् हा लक्ष्मण! गजू हा फोटो देवात लावायला असूं दे!"

"अग तो फोटो कॅलेंडर मधून कसा फाडता येईल? सारी पाने फाटतील ना! आपण दुसरा फोटो आणूं एखादा! मग मी त्याची रोज पुजा करीन, फुले आणीन, उदबत्ती लावीन. मग खूप गंमत येईल नाही? आई, मला एक रुपया देशील! मी खूप छान छान चित्र आणूं शकतों."

"या कॅलेंडरसाठी तर तूं माझ्याकडून पैसे घेतले नाहीस? मग कसं आलं हें कॅलेंडर!"

"अग कॅलेंडरला पैसे पडत नाहीत, ते फुकट पाठविलं जातं!"

"हो का?" म्हणत यमुना उठली. तिला गायीम्हशींच्यापुढे गवत टाकायचं होतं.



## : २ :

सहासात वर्षे झालीं, विनायक पैसे मिळवायच्या आशेने मोठ्या शहरात गेला होता. तशी त्याची घरची स्थिति काही वाईट नव्हती. गाई, म्हशी, थोडीशी शेती, आणि शेतात बांधलेली विहीर ! खेड्यात सर्वांच्या जवळ इतकं तरी कुठं असतं ? आपला मुलगा या साऱ्यावर लाथ मारून मोठ्या शहरांत पैसे मिळवायला गेला हे विनायकाच्या बापाला मुळीच आवडलं नाही ! घरच्या गोमातेची सेवा करायचं सोडून दुसऱ्याचे जोडे पुसायला तयार होणारीं हीं आजकालचीं मुले ! काय म्हणावं याना ! त्यानी नानातऱ्हेने विनायकाला समजावलं, पण काही उपयोग झाला नाही ! यमुनेच्या रडण्यापडण्याने मात्र त्याचे मन कच खाई ! आपली इतकी सुरेख बायको अन् तो लहानसा लोभस पोरगा ! याना सोडून जायला त्याला धीर होईना ! पण ज्याच्या शिकवणीने तो गाव सोडून जायला तयार झाला होता तो त्याला म्हणायचा;

"लेका, काय भ्याड आहेस रे ! सुन्दर बायको आणि मुलाच्या पाशात पडशील तर सारं गमावशील ! तूं मर्द आहेस ! बायकोच्या गुलामगिरींत राहणं योग्य नाही !"

शेवटीं एके दिवशीं मोटी हिंमत करून, कोणाला न सांगता विनायक घर सोडून निघून गेला. सुरवातीला त्याचीं एकदोन पत्रे आलीं. कलकत्त्याला एका कारखान्यांत त्याला नोकरी मिळाली होती. "आपला मुलगा इतकी हिंमत करून फार दूर गेला" या त्याच्या धाडशी कृत्यांबद्दल त्याच्या वडिलांनी आपल्या मनाला धीर दिला. तो किती

दूर गेला होता हें त्याच्या वडिलानाही माहीत नव्हते. मुलं किती घरघुशीं असतात ! कुठं कुठं जायचीं नाहीत. आपल्याला नव्हती का तरुणपणात गाव सोडून शहरात जायची महत्त्वाकाक्षा ! मग आपण का त्याला विरोध करावा ? मोठ्याचं मोठेपण क्षमेंतच आहे. आपण कुठं गेलो होतो गाव सोडून ! त्याला मनाचं सामर्थ्य लागतं ! विनायकाने खरोखरीच मोठ धैर्य दाखविलं या विचारानी तो गर्वित झाला ! जेष्ठाच्या कडक उन्हाळयात शेजारीं कोठे तरी पाऊस पडून ग्रीष्माकुल शरीराला गार वाऱ्याची झुळुक मिळावी तसेंच काहीतरी त्याला वाटले आणि याच समाधानावर तो जगं लागला. रोज जीं नवीं नवीं मंडळी भेटत त्याना ती मोठ्या वात्सल्याने आणि कौतुकाने विनायकाच्या कर्तबगारीचे वर्णन सागत असे; त्यात त्याला फार मोठं समाधान वाटत असे.

पण हे कौतुक फार दिवस टिकलं नाही. सुरवातीला एक दोन महिने त्याचीं पत्रे आलीं. कोणातरी बरोबर एखादेवेळीं खुशालीही कळत असे. पण पुढे कालातराने एकाएकीं पत्रव्यवहार बन्द झाला. बिचारा बाप काळजीने अर्धा होऊन गेला आणि खाटेला खिळला गेला.

'मन चितीं ते वैरी न चिंतीं' म्हणतात ते काही खोटं नाही. म्हाताऱ्या बापाच्या मनांत असख्य अभद्र कल्पना थैमान घालूं लागल्या ! लाडक्या मुलाची खंत घेणाऱ्या म्हाताऱ्याला आता यमुनाच एक मात्र आधार होती। तिला जवळ बोलावून तो म्हणाला, "सूनबाई, माझ्या कपाळावर हात ठेव पाहू जरा ! अहाहा !! किती छान वाटतं ! तुझ्या हाताच्या स्पर्शाने विनायकाच्या हाताइतकेंच समाधान मिळत आहे ! मनाला शाति मिळत आहे ! विनायक नाही ना आला अजून ! न येऊं दे ! तूंच माझा खरा विनायक ! तूं आणि तो काही वेगळे थोडेच आहांत ! अन् हें काय ? खुळी कुठली ? रडतेस होय ! तूं जवळ येऊन बसल्यामुळे माझे दुःख दूर-दूर पळून गेलं आहे. अशा वेळीं रडूं नये बेटा ! मला आता बोलावणं आलं आहे ! तूं रडलीस तर मला दुःख

होईल ! गजूला नीट साभाळ ! तुझी पुण्याई तुला कांही कमी पडूं देणार नाही !" असे म्हणून त्या म्हाताऱ्याने प्राण सोडला ! त्या पार्थिव देहातून आत्मा निघून गेला !—आणि त्या दिवसापासून त्या एवढ्या मोठ्या घरात यमुना आणि तिचा लाडका गजू असे दोघेच राहिले !

त्यानंतर यमुनेला सारं आयुष्य निराशामय वाटूं लागलं ! सर्व-दिशाना तिला काळाकुट्ट अंधारच दिसूं लागला ! ज्या घरात सासू-सासरा-पति यांच्या प्रेमळ छत्राचा तिला आश्रय होता तिथे ती आता एकटीच कशी राहूं शकणार ? तिला काही सुचेना ! ती भाबावून गेली. गोंधळून गेली. दुःखाचा डोंगरच कोसळला होता तिच्यावर ! आपल्या लाडक्या गजूकडे पाहून तिने मनाला धीर दिला ! काळाच्या प्रचण्ड ओघात ती माग या गोष्टी हळूहळू विस्मृतीत टाकूं लागली.

यमुनेला अनुभवाने आता पुष्कळ गोष्टी समजूं लागल्या होत्या. आपल्याला सावकाराचे कर्ज आहे हे मामंजींनी मरताना सांगितलं होतं. कर्ज वेळेवारी जर चुकतं केलं नाही तर ते दामदुप्पटीने वाढतं हे तिच्या अशिक्षित बुद्धीला चागलं कळत होतं ! कर्ज हे नेहमी वाढतच जातं, त्याला सीमाचं बंधन नाही. तिचं कर्ज जरी फार नव्हतं तरी ते कर्ज होतं ! आणि म्हणूनच तिने काही गुरंढोरं गहाण ठेविलीं होतीं. विहीर अन् शेत मागेच मामंजींनी गहाण ठेवलं होतं. ते मोकळं करणं तिच्या आटोक्याबाहेरचं होतं !



दिवस जायला काही वेळ लागत नाही, कालाच्या गतीला कोणी रोखूं शकत नाही ! गजू आता नियमीत शाळेंत जाऊं लागला होता ! त्याच्या मोठ्या दफ्तराकडे पाहून यमुना धन्य होई ! तिला वाटे 'आपला बाळ शिकत आहे !' म्हण आहे ना की 'असेल बाळ तर फिटेल काळ !' गजू शाळा शिकूं लागला पण "ह्याचे" पत्र जेव्हा त्याला खाड खाड वाचता येईल तेव्हाच खरं समजेन मी !

यमुना गजूला तळहाताच्या फोडाप्रमाणे जपत असे. तिच्यासमोर अनेक प्रलोभने आली होतीं ! गावातल्या लोकाचे काय ? कांहीहि बोलायला तयार ! यमुनेच्या मनांत असतं तर केव्हाच दुसरे लग्न करून ती मोकळी झाली असती ! आख्या गावाला जेवण देऊन सर्वांचीं तोंडं बंद केली असतीं तिनं ! पण तिच्या पवित्र मनात असले विचार चुकूनही आले नाहीत.

यमुना आपल्या पतीच्या–विनायकाच्या–आठवणी विसरायचा प्रयत्न करीत असे ! त्यामुळे तिच्या अंतःकरणात वेदना होत असत. आणि मग ती वृद्ध मामंजीच्या एकेक गोष्टींचे स्मरण करी ! पतीच्या स्मृतिमुळे अनुरागाचे रागात रूपांतर होई. पण मामंजीच्या साऱ्या स्मृति उदात्त होत्या, पवित्र होत्या. 'ते मला बेटी म्हणत. मरताना मला म्हणाले होते, तूं हे घर सोडूं नकोस ! तुझी पुण्याई तुझं कल्याण करील !' माझी कसली पुण्याई ? आणि ती खरोखरीच असती तर आजचा हा दिवस नशीबीं कशाला आला असतां ? त्याचीच खरी पुण्याई ! स्वर्गी गेले अन् सोन्याचे झाले !'

यमुनेकडे पाहून कोणाला वाटलं नसतं की ती दुःखी आहे ! घरातलीं सर्व कामें ती करते आहे; खाणं पिणं अन् पाच सहा तास झोप घेणं हें सारं चालू आहे तिचं ! शरीराने सुद्धा ती कृश दिसत नाही ! गजूकडे पाहून ती आपले जीवन कंठीत असे ! तरीपण कुठेतरी काहीतरी तिच्या मनात डाचत असे. आकाशात ज्याप्रमाणे एकाएकी वावटळ येते तसेंच कांहीतरी तिच्या मनात होत असे. भूकंपाने जशी एखादी टोलेजंग इमारत हादरावी तसेच त्या दिवशीं पोस्टमन आल्याने तिच्या खंबीर मनाला हादरा बसला. पोस्टमन आपल्या घरीं आला, जाडजूड पाकीट देऊन गेला आणि ते पाकीट आपल्या पतीचें निघूं नये ! केवढे आपले दुर्दैव ! भाग्याने जणूं त्या भुकेलीपुढे सुंदर पक्वान्नांचें ताट जेवण आणावें आणि ती हात पुढे करतें तोंच निर्दयतेने आपणच तें गट्ट करावें त्यातलीच ही तऱ्हा होती !

रात्रीं निजताना, खाटेवर पडल्या पडल्या गजूला पुन्हा सकाळचा प्रसंग आठवला. "माझे कॅलेंडर पाहून शाळेतली मुलं अगदी थक्कच झालीं !" तो सांगू लागला, "अग आई ! आमच्या शाळेतलीं मुलं किनई कुठली कुठलीं चित्र कापून अलबम तयार करतात. आणि मला म्हणायचे कसे ! 'आमचा किती सुंदर अलबम आहे !' पण आई, माझं कॅलेंडर पाहून सारे थक्कच झाले ! मी त्याच्या हातात पाहायला दिलं नाही म्हणून माझ्याशीं कट्टीच घेतली आहे काहींनी ! बदमाश लेकाचे !!"

यमुनेला रोज या किंवा अशाच भाषणात भाग घ्यावा लागत असे ! आज गजूने पाहिलं, आई काहीच बोलत नाही. तरी पण त्याचें पुराण चालूंच होतें. तो म्हणाला, "आई ! माझी अन् रामूची आज कट्टी झाली !"

"कोणाशीं भांडणं चागलं नाही गजू ! रामू चागला मुलगा आहे !" यमुना म्हणाली.

रामू त्या गावच्या पाटलांचा मुलगा ! मधून मधून गजू आणि रामू याची चकमक व्हायची ! तो म्हणाला, "कुठला चागला ? चांगला आहे तर खोटं कशाला बोलतो ? म्हणे—अशीं कॅलेंडरें आमच्या घरीं ढेरभर आहेत ! आहेत तर आणले का नाही शाळेत दाखवायला एखादें ? मला कशाला तोंड वेगाडून म्हणत होता की, 'मला दाखव ना रे ! एकदाच हातांत घेऊन पाहूं दे !' मी म्हटलं, 'हातात नाही देणार ! दुरूनच पाहा ! तूं मळवून टाकशील !' मी ते पहायला दिलं नाही म्हणून त्याने माझ्याशीं कट्टी केली. केली तर केली, मला पुष्कळ मित्र आहेत !"

आई अजूनही कांहींच बोलत नाही हें पाहून गजू म्हणाला, "आता मी कलकत्त्याहून दुसरं कॅलेंडर बोलावणार आहे; ते याहूनही चांगलें असेल !" कलकत्त्याचें नांव काढतांच आईला आनंद होतो हें तो ओळखून होता; अन् झालंही तसेच ! यमुना एकदम म्हणाली. "तूं मागवूं शकशील ?"

गजू अहंपणाच्या स्वरात म्हणाला, "हो! का नाही? आम्हाला भूगोलांत कलकत्ता कुठं आहे ते शिकवलं आहे ना! तेथे तांदुळ अधिक पिकतो! बरं आई! माझा एक प्रश्न सोडीव बरे! पंजाब कशासाठी प्रसिद्ध आहे, साग पाहू?"

यमुना निर्विकारपणे उत्तरली; "मला काय ठाऊक?"

"तुम्हाला शिकवलं नव्हतं! हाच प्रश्न आज मास्तरानी रामूला विचारला, पण त्याला त्याचं उत्तर सागताच आलं नाही! श्रीमंताचा मुलगा म्हणून उगाच ऐट करतो! काही येईना जाई! आज चागली छडी मिळाली वर्गात त्याला!"

"गजू, तुला येत होतं ना त्याचं उत्तर? मग तूं त्याला अगोदरच का नाही सागितलं म्हणजे बिचाऱ्याचा मार तरी चुकला असता. आणि तुमचे मास्तर पण बरेच दिसतात मला! श्रीमंताच्या मुलाला वाटेल तसे मारतात!" आई म्हणाली.

"नाही आई! आमचे मास्तर फार फार छान आहेत बरं! आई—वडिलाच्या पेक्षा ही गुरुजीचा मान मोठा असतो. 'छडी लागे छम्-छम्, विद्या येई घम-घम'. छडीच्या धाकानेच तर सारी मुले अभ्यास करतात!"

"बरं आहे बाबा! माझ्याच्याने तर दुसऱ्याच्या पोरावर चुकून हात उठायचा नाही!" ती म्हणाली.

"तूं किती चागली आहेस ग आई! बाबा पण असेच आहेत का? मोटा झाल्यावर मी त्याना कलकत्त्याला पाह्यला जाईन!"

"मला नेशील बरोबर? की तूं पण मला सोडून जाणार?" यमुना गंमतीने म्हणाली.

मोठ्या गाभीर्याचा आव आणून गजू म्हणाला,

"तुला नेलं असतं ग. पण बायकांनी तेथे जाण फार कठीण आहे! खूप गर्दी असते तेथे! रस्त्यांत तूं चेंगरायचीस कुठे! मी बाबांना न पाहतांही ओळखूं शकेन!"

"कसं ओळखशील तूं ?" यमुना आतुरतेने म्हणाली.

"त्यांत काय मोठंस ? अगदी सहज ओळखेन मी ! सगळे म्हणतात, गजू अगदी आपल्या बापासारखा आहे ! आई ! मी तुझ्यासारखा कां नाही दिसत ? तुझ्यासारखा असतो तर छान झालं असतं ! मला तूं फार आवडतेस !"

यमुनेचे डोळे आनंदाश्रूंनी भरून आले. विषय बदलण्याच्या उद्देशाने ती म्हणाली, "गजा ! नीज पाहूं आता ! पुरे झाली वटवट ! सकाळीं शाळा आहे ना ! आपण झोंपत नाही आणि मला पण झोपूं देत नाही !"

गजू चूप झाला. थोडा वेळ डोळे मिटून पडल्यावर तो एकदम म्हणाला, "आई ! रामूची एक जम्मत सागूं तुला ?" आई काहीच उत्तर देत नाही हे पाहून त्याने पण आपली कूस बदलली आणि एक दीर्घ श्वास घेऊन तो कांहीतरी पुटपुटला.

गजू थोड्याच वेळात घोरूं लागला.



## : ३ :

आजकाल यमुनेची झोप पार उडाली होती. मनांत भलते भलते विचार थैमान घालीत ! या विचारांना ती हटविण्याचा प्रयत्न करीत असे पण ते तितक्याच वेगाने पुन्हा उसळी मारीत.

माजघरातला दिवा नेहमी प्रमाणे मालवला होता. पूर्ण अंधार झाला होता. काहीहि दिसत नव्हतें. तिच्या मनात देखील असाच अंधार नव्हता का ? सारं वातावरण अगदी निस्तब्ध होतं ! शेजारी झोपलेल्या गजूचं घोरणंच काय ते ऐकूं येत होतं. मधेच एखाद्या कुत्र्याचं भुंकणं ऐकूं येई ! जणूं त्या निस्तब्धतेचा तीव्र प्रतिकारच करीत असावं ते ! अशा वेळी यमुना तासन् तास विचार करीत बसायची ! या विचारात कोणीही अडथळा आणण्याची भीति नव्हती तिला. आज किती तरी वर्षे तिने अशींच घालविलीं होतीं ! या कुशीवरून त्या कुशीवर वळता वळता डोळा केव्हा लागला हे समजलं देखील नाही. झोपेत तिने स्वतःला हिंडता-फिरताना पाहिलं.

ती पाहूं लागली; "एखाद्या निर्जन स्थानीं ती गेली आहे. चहूकडे भाताची हिरवी हिरवी शेती डौलात डुलत आहे ! गजू सागत होता ना, की कलकत्त्याला तादुळ खूप पिकतो म्हणून ! एवढं मोठं शेत पण इथे तर कोणीच नाही ! जिकडे तिकडे हिरवळच हिरवळ ! ती एकटी कुठं जाणार ? जवळ पास कोणाचीच चाहूल लागत नव्हती. चालता चालता थोड्या अंतरावर तिला एक वन-माणूस दिसला. ती घाबरली ! तो वळून वळून तिच्याकडे रोखून पाहात आहे असा तिला भास झाला. त्याच्या भयंकर भीतीने ती दूर दूर चालली होती. चालून चालून तिचे

पाय दुखूं लागले पण ती थांबली नाही. एखाद्या लॉरीच्या मागे नादुरुस्त मोटार जशी भल्या जाड दोरीने बाधून ओढली जाते तशीच ती ओढली जात होती. दाट झाडींत मधेच तिचं लुगडे अडके, कुठे काट्या-कुट्यात अंग खरचटलं जाई, तरी पण ती बेभान होऊन चालली होती! कशाचाही विचार करायला तिला वेळ होता कुठे? त्या वनमानवाकडे पाहता पाहता तो केव्हा दृष्टिआड झाला हें तिला कळलंही नाही! अशाच स्थितींत ती त्या अफाट कर्दलीवनात येऊन पोहोचली. चोहीकडे अत्यंत दाट अन् किर्र ऽऽ झाडी! कुठं जावं अन् काय करावं हें तिला समजेना. ती कावरी बावरी झाली आणि इकडे तिकडे भिरभिरत्या नजरेने पाहूं लागली. इतक्यात कोणी तरी गाणं गुणगुणत असल्याचा तिला भास झाला. मोठ्या आशेने ती त्या दिशेकडे झपाझप पाऊले टाकूं लागली तो तिला दुरून दोन माणसाच्या आकृत्या दिसल्या! त्या पैकी एक स्त्री होती आणि दुसरी आकृति? हे काय? आणखी जवळ जाऊन पाहते तो ती दुसरी व्यक्ति विनायकच आहे अशी तिची खात्री झाली! "ही बाई कोण आहे यांच्याबरोबर?" ती दचकली; घाबरली!

इतक्यात ती बाई यमुनेकडे बोट दाखवून म्हणत आहे, "हिलाच तुम्ही बरोबर आणणार होता काय? कोण आहे ही?"

यमुना भीतीने घाबरून गेली. तिला वाटलं, आपल्या छातीवर कोणी मणाचाच दगड आणून ठेविला आहे! ती मोठ्याने ओरडूं पाहात होती पण तिची जीभ काम देत नव्हती!

विनायकाने त्या स्त्रीस सांगितले, "आमच्या खेड्यातील बाई आहे ही! हिच्याबद्दल मी नव्हतं का तुला सांगितलं!"

"ईऽऽईऽऽ! काय पण ध्यान आहे! तुमच्या खेड्यात अशींच अडाणी माणस आहेत वाटतं!" असे म्हणत ती खो खो हसूं लागली. विनायकाने पण तिच्या सुरात सूर मिळविला.

यमुनेच्या अंगाचा तिळपापड झाला. या हडळीच्या तावडींत सापडले आहेत बिचारे? तिला दया आली विनायकची! काय हितगुज

चाललं आहे त्या बयेबरोबर ! माझ्याकडे पाहायला देखील तयार नाहीत ! काय पण ध्यान आहे ! न रूप ना रंग ! नुसती टापटीप आणि फॅशनच पाहून घ्या !

यमुना दांत ओठ काढून तिच्यावर धावली. तो काय चमत्कार ! तिनं पटकन आपलं रूप बदललं ! ती तर डाकिणीसारखी दिसूं लागली !

यमुना भीतीने किंचाळली आणि तिने आपले डोळे उघडले !

"आईऽऽ ! आईऽग !! काय झालं ?" म्हणून गजू सुद्धा आपल्या खाटेवर उठून बसला !

बाहेर पक्ष्यांची किलबिल सुरू झाली होती पण अजून चांगलं उजाडलं नव्हतं ! प्रभात झाल्याचीं चिन्हे दिसूं लागलीं होतीं ! कोणाच्या स्वागताचीच तयारी जणूं काय सुरू असल्याचे वाटत होते !

गजूला उठलेला पाहून यमुना लज्जित झाली. ती म्हणाली, "गजू घाबरूं नकोस ! मला की नाही एक स्वप्न पडलं होतं !"

आश्चर्यचकित होऊन गजूने विचारले, "तूं जर स्वप्न पाहात होतीस तर मग इतक्या जोराने किंचाळलीस का मग ?"

"तसेच स्वप्न होते !"

"सकाळचे स्वप्न खरं होतं अस म्हणतात ! खरं नाही ना होत आई ? मला कधीच असलं स्वप्न पडत नाही ! तूं काय पाहिलंस आई स्वप्नांत ?" गजू थोड्याशा घाबरलेल्या मनःस्थितींत विचारीत होता.

यमुना आपल्याच विचारतंद्रींत होती ! गजूचा प्रश्न तिच्या कानापर्यंत पोचलाही नाही !

ती अत्यंत उदास अंतःकरणाने आंथरूण गुंडाळून खाट उचलूं लागली.



## : ४ :

दिवसभर यमुनेच्या मनांत तेच विचार घोळत होते की सकाळचीं स्वप्ने खरीं होतात म्हणून. किती दुर्दैवी होती ती ! स्वप्न देखील तिच्यासाठी स्वप्न राहिलं नव्हतं ! "ह्याच्याबद्दल" ज्या ज्या अफवा आपण ऐकतों त्या अफवाशीं आपले स्वप्न किती जुळतं आहे ! ते अजून कसे आले नाहीत ! अशीच काहीतरी भानगड असावी ! तिच्या मनात सारखा सघर्ष चालू होता. शेजारणी तिला विनायकाबद्दल कांही भलतं सलतं बोलल्या तर ती कधीहि ऐकून घेत नसे ! लोकाचीं तोडं एकवेळ बंद करता येतील पण......! पण या पडलेल्या स्वप्नाच्या वस्तुस्थितीशी ती कशी झगडणार होती !

आपण प्रत्यक्ष आपल्या डोळयानी त्या बाईला पाहिलं आहे ! तिचा आवाज ऐकला आहे ! ती दुःखित अंतःकरणाने देवाचा धावा करूं लागली. "हे परमेश्वरा ! माझं पहिलं पतिवियोगाचं दुःख काय कमी होतं ? आणखी त्यात याची भर कशाला ? हे सर्व उघड्या डोळयानी पाहण्यापेक्षा मला आधळी आणि बहिरी केलं असतं तर किती छान झालं असतं !"

लागलीच ती भानावर आली ! "पण मी इतक्या जोराने किंचाळावें कशाला की गजूने सुद्धा जागं व्हावं ! ती डाकीण काय मला खाणार होती ? चांगलं तिच्याशीं भाडायला हवं होतं ! चोरच्या चोर नि शिरजोर ! स्त्रीने कठोर व्हायचं ठरविलं की ती अत्यंत कठोर होते ! परन्तु माझी इतकी पुण्याई कुठं आहे ! पुण्यवान माणस यमाच्या तावडींतून देखील आपली संपत्ति हिसकावून आणूं शकतात !"

दुपारीं गजू शाळेतून आल्यावर यमुना त्याला म्हणाली, "गजू! आज सध्याकाळीं पोथी वाचून दाखव हं !"

आज यमुनेने मन लावून पोथी ऐकण्याचा निश्चय केला होता. पोथीचा अर्थ समजला नाही तरी हरकत नाही, असे तिने मनाशी ठरविले होते.

गजूला वाटले, आई नेहमी आपल्याला पोथी वाचायला सागते. आज त्याला कंटाळा आला होता. आईला काहीतरी सबब सागावी म्हणजे व्याद टळेल ! तो म्हणाला, "आई ! पोथी फार फाटली आहे; एक एक पान वेगळे झालें आहे. वाचावेसे सुद्धा वाटत नाही."

"अरे गजू ! किती चागली पोथी आहे आणि तूं म्हणतो की वाचावीशी वाटत नाही ! इतक्या मोठ्या अक्षराची पोथी दुसरीकडे कुठं नाही मिळायची ! पाच रुपयाना घेतली आहे ती पोथी !"

"पाच रुपये ? मी दोन रुपयात सोनेरी कव्हरची आणूं शकतो. सुंदर चित्र असलेली, खाली अर्थ लिहिलेली. त्या पुस्तकाच्या दुकानात आजच आली आहे. आणूं ती पोथी ? रुपये देतेस आणायला ?"

"तूं रोज नियमाने वाचशील ?" तिने अधीर होऊन विचारले.

गजूला वाटले होते, आई नकार देईल. तो एकदम म्हणाला, "हो, हो ! दे तर मग पैसे !"

यमुनेने पोथीसाठी पैसे दिले. पोथीसाठी दिलेले दोन रुपये सत्कारणींच लागणार होते. ती म्हणाली, "गजू नीट पाहून आण हं पुस्तक ! पाने फाटलेली नकोत ! अगदी कोरं करकरीत आण हं !"

गजू नाचत बागडत दुकानाकडे गेला. त्याला आनंदाने बागडताना पाहून यमुनेचे डोळे आनंदाश्रुंनी भरून आले. पोथीसाठी किती हट्ट धरला गजूने ! हे परमेश्वरा ! चागल्या गोष्टीसाठी अशीच बुद्धि दे त्याला !

असे म्हणून तिने परमेश्वराला दोन्ही हात जोडून वंदन केले.



घरात एकटं राहून राहून ती फार अस्वस्थ होत असे! नेहमीचे घरकाम कसे तरी आटोपून ती शेतावर जावयास निघाली!

गावाच्या बाहेरचे ते एक अत्यंत रमणीय स्थळ होतं! चारी बाजूला गहू आणि चणा फुलून उठला होता. त्यामुळे सारीं शेतं हिरवी-गार दिसत होतीं. अळशी अन् सरसूची पिवळीं फुलं हिरव्या गालीच्यावर खुलून दिसत होतीं!

या शात वातावरणात तिचं मन अधिक उदास झालं! शेती दुसऱ्याच्या भागीदारींत होत होती! काम काज विशेष काहीच नव्हते! जे होते त्यात तरी तिचं मन कुठं लागत होतं!

काळोख पसरूं लागला होता! गुरं-ढोरं पुढे हाकीत डोक्यावर सरपणाच्या काड्या-कुड्या लादून गुराखी, त्याच्या बायका नि मुले झपा-झप पावले टाकीत चालले होते. शातता आणखी गंभीर होत चालली होती. तरीपण यमुना आपल्या विहीरीवर जाऊन बसली!

विहिरीजवळच आम्र्याचं एक झाड आहे. अजून आंबे आले नव्हते. मागच्याच वर्षी दाट मोहोर आला होता. दाट पसरलेल्या सुंदर आकाराच्या झाडाकडे ती पाहूं लागली. पाहता पाहता तिच्या नेत्रातून अश्रू ओघळून पडले. किती वेळ तिने ते आवरून धरले होते! अश्रूंना सुद्धा वेळ-अवेळ कळते म्हणायची! म्हणूनच ते इतका वेळ डाबून राहिले. आता अशा एकात समयीं नि निर्जनस्थानीं ते कसे कोंडून राहणार! इथे कोणाची भीति नाही आणि काही नाही! तिने मन-सोक्त रडून घेतले.

तिची विचारमालिका सुरू झाली. "आज बुधवार आहे! हो! पण बुधवारचाच दिवस होता तो! हीच वेळ होती! पुनवेचा चंद्र साक्षीला होता! हीच जागा होती ती! आणखीही पुष्कळ गोष्टी होत्या! सासूबाई नि मामंजी होते त्यावेळी! ह्याना काय लहर आली कोणास ठाऊक! एकदम म्हणाले, 'चल, आपण ती आंब्याची कोय

लाऊं !' माझा हात धरून ओढीत ओटीपर्यंत आणलं ! मी म्हणतच राहिले, 'अहो हें काय ? कोणी पाहील ना ?' चोहीकडे सामसूम पाहून माझी भीड पण पळाली. ते खुरपीने खणूं लागले आणि मी घागर घेऊन विहिरीचे पाणी आणायला गेले. कितीतरी सुखद स्मृति आहेत या झाडाच्या !"

त्या एकांत जागीं ती आणि तिचा पति, दोघेच होते. तिसरं मध्यस्थी कोणीही नव्हतं ! त्यांच्या दोघातले सारं अंतर दूर झालं होतं. अशा सुंदर समयीं ती अबोल कशी राहील ? लग्नानंतर आतापर्यंत ती घराच्या चार भिंतीतच दडून राहिली होती. त्याच ठिकाणी ती आपल्या पतीला भेटूं शकत होती. हा पहिलाच प्रसग होता की तिला अशा मोकळ्या वातावरणात पतिबरोबर असा एकातवास मिळाला होता. तिच्या अंगात गोड शिरशिरी भरली. हळूच लाजून तिने विनायकाकडे पाहिले. विनायक तिच्या स्पर्शाला अधीर झाला होता. त्याने तिला हळूच ओढले अन् तिची हनवटी हातात धरून तो म्हणाला, "का राणी सरकार ! तयारी आहे ना कोय लावायची ?"

विनायकाने कोय लावण्यासाठी माती उकरली अन् हळूच एक ढेकूळ तिच्या अंगावर फेकून मारले. यमुनेने मान मुरकून मोठ्या ऐटीने पदर झाडला अन् टमकाऱ्यात म्हणाली, "अशी का कुठं माती उकर-तात ? द्या पाहू ती खुरपी ! मी दाखवते खणून ?"

खड्डा खणून झाला.

माती सारखी केली गेली.

विनायक म्हणाला, "यमुना ! तूं लाव ना कोय !"

"अं हं ! मी नाही ! तुम्हीच लावा गडे !"

"हा फार रसाळ नि मधुर. आंबा आहे. याचे आंबे आपण खूप दिवस खाऊं ! तूंच लाव ना ! बायकाच्या हाताला जास्त यश असतं !"

"वा रे वा ! बायकानी लावलेल्या झाडाचीं कां कधी फळें खातात ?" यमुना त्याला चिडवूं लागली.

विनायक म्हणाला, "हो ना ! बायकाच्या हाताच्या का कुणी रोप्या खातात ?"

"तम नाही हो ! पण मी अभागी आहे ! मी लावलेलं झाड कधी लागायचं नाही !" यमुना गंभीरपणाने म्हणाली.

विनायकाने हळूच तिचा हात आपल्या हातात धरला अन् आपल्याजवळ ओढीत तो म्हणाला, "कोण म्हणतो तुला अभागी ? मी तुझ्याजवळ असताना कोणाची हिम्मत आहे तुला अभागी म्हणायची !"

बराच वेळ प्रेमी जोडप्याचं हितगुज झाल्यानंतर कोय दोघानी लावायची असं ठरलं ! आणि अशारीतीने त्या दिवशीं दोघांनीही वनमहोत्सव साजरा केल्याचे श्रेय पत्करले.

कोयीला अंकुर फुटलेला जेव्हा यमुनेने पहिल्यादा पाहिलं तेव्हा तिचा आनंद गगनात मावेना ! अंतःकरणाच्या प्रेमरसाने तिने त्याचें सिंचन केलं होतं. या अवधींत कितीतरी सकटं तिच्यावर आलीं पण ती त्या आम्रवृक्षाला भेट द्यायला कधीच चुकली नव्हती ! विनायक नेहमी तिला म्हणे की, "या झाडाच्या पहिल्या फळाचा नैवेद्य मी माझ्या देवतेला दाखवीन !" या वर्षी झाडाला आबे नक्की येतील ! पण ते कुठे असतील ? मला पहिल्या फळाचा नैवेद्य दाखविणारे कुठे असतील कोण जाणे ! मला विसरले असावे बहुतेक ! ते तरी काय करणार बिचारे ! कुणाच्या तरी फंदात अडकले असतील ! नाही तर मला विसरणं शक्य नाही !

कोय लावण्याचा तो प्रसंग ! इतके दिवस उलटून गेल्यावरहि अगदी तसाच तिच्या स्मृतींत ताजा आहे. जणूं कालच घडला असावा ! प्रत्येकाच्या जीवनांत असे कांही चिरस्मरणीय प्रसंग असतातच ! काळ बदलतो व तो पुढे धावत असतो. स्मृति मागे गेल्या असल्या तरी सदैव ताज्याच वाटतात ! त्या स्मृतींची गोडी अवीट असते. यमुना या स्मृतींत अशीच तल्लीन झाली होती.

"अरे कोण आहे या झाडाखाली ? तुम्ही तर यमुनाबाई ! वा ! तुम्ही या वेळीं इथे कशा ?" या आवाजाने यमुना एकदम भानावर आली. केशवला पाहून ती जरा ओशाळली ! तो समोरच पायवाटेवर उभा होता. ती म्हणाली, "घरी चालले मी ! तुम्ही कोणीकडे इकडे ?" "तुळशीरामच्या घरीं गेलो होतो. सारे उपाय सपले की मग केशवकाकाची आठवण होते. त्या तुळशीरामची बायको किती खराब झाली आहे ! अगदी प्रेतकळा आली आहे तिच्या चेहऱ्यावर ! मोठे मोठे डॉक्टर, वैद्य हरले, तेव्हा आला झक मारत माझ्याकडे ! तिच्या आयुष्याची दोरीच बळकट ! एक दिवसाचा जर उशीर झाला असता तर आटोपला असता कारभार !" केशव बोलत होता.

यमुना त्याच्या बरोबर हळूहळू चालूं लागली. गावात केशवची मंत्र-विद्या साऱ्याना ठाऊक होती. यमुनेचा मंत्र-तंत्रावर मुळीच विश्वास नव्हता ! पण आज तिचे मन पहाटेऱ्या स्वप्नाने दुखवलं गेलं होतं. त्याची आठवण होऊन ती एकदम म्हणाली, "केशवभय्या ! सकाळची स्वप्नें खरीं ठरतात का ?"

"कधी कधी होतात; आणि कधी कधी होत नाहीत ! आधी सांगा, स्वप्न कोणाला पडलें, काय पडलें ? ते कळलं म्हणजे सागता येईल !" केशव म्हणाला.

यमुना एकदम चुप झाली. काय उत्तर द्यावं हें तिला कळेना ! नंतर केशवने विचारले,

"विनुभाऊबद्दल काही स्वप्न पडलं का तुम्हाला ?"

चंद्र झाडाआड लपला होता. मान खाली घालून जड अंतःकरणाने ती उत्तरली, "हो !" ज्याच्या त्याच्याजवळ विनायकाची कर्मकहाणी सागायला तिला संकोच वाटत असे.

"मला वाटलंच की तुम्ही त्याच्या काळजींत आहात आणि एखादं स्वप्न पडल्यामुळे घाबरल्या असाव्यात ! पण यमुनाबाई ! किती दिवस

अशा झुरत राहणार तुम्ही! माझा सल्ला ऐका! दुसरं लग्न करून नवा संसार थाटा अन् सुखाने राहा! तुमचं काय वय थोडंच झालं आहे! इतके दिवस तुम्ही खोट्या आशेने विनायकची प्रतीक्षा केली! इतकं तरी हल्ली कोण करतंय!"

यमुनेला केशवचा राग आला! ती म्हणाली, "तुमच्या बायकोला मरून इतकीं वर्षं झालीं, मग तुम्ही का नाही केलं दुसरं लग्न?"

हा प्रश्न ऐकून केशवने प्रदीर्घ उसासा टाकला. तो जड अंतःकरणाने म्हणाला, "माझी गोष्ट सोडा! मी पडलों मांत्रिक! फार वाईट असतं आमचं जिणं! कधी कधी जीवालासुद्धा धोका असतो! आणि......"

"आणि...काय?" यमुनेने विचारले.

"कुणालाही आपली कर्मकहाणी सांगून नशीबातले थोडेच चुकणार आहे!" यमुना गंभीर झाली होती. तो पुढे बोलूं लागला,

"माझं नशीब जर फुटकं नसतं तर घरची लक्ष्मीच कशाला गेली असती आम्हाला सोडून! आता ती गेली ती गेली! तिच्या गोड आठवणीवरच जगायचं ठरवलं आहे मी! लोक म्हणतात, मी फार वाळत चाललो. दुःखच दुःख कपाळी असलं तर मनुष्य भरणार तरी कसा? कुठे कोणाकडे मंत्र-तंत्रासाठी गेलो की, दिवस दिवस निघून जातो. दुसरीकडे पाण्याचा घोटसुद्धा घेत नाही! कधी कधी उशीर झाला की तसाच पडून राहतों मी! काय करावं आणि कसं करावं! म्हणतात ना "आलिया भोगासी असावे सादर!"

यमुनेला कींव आली त्याची! तिची स्वतःची पण अशीच परिस्थिती नव्हती का? हो बरोबर आहे केशवचे म्हणणे! 'आलिया भोगासी असावे सादर!' एकदा तिच्या मनात आलं, केशवला आपल्या घरीं फराळासाठी घेऊन जावं! बोलता बोलता ते दोघंही चौरस्त्यावर आले! दोघानाही विरुद्ध दिशेला जायचं होतं!

"फार अंधार झाला आहे ! तुम्हाला मी घरापर्यंत सोबत करतों आणि मग मी पुढे जाईन ! इतक्या रात्री बाईमाणसाने एकट्याने जाणं ठीक नाही !" केशव म्हणाला.

"जाईन मी एकटी ! आज पहिल्यादाच थोडी जात आहे !" यमुनेने उत्तर दिलें.

"अरे हो ! पण ते स्वप्न सांगायचं राहिलंच ! पुढे सांगा केव्हातरी ! आता मी जातों !"

केशव आपल्या घराकडे निघून गेला. यमुनेला वाटलं किती वेळचा गजू घरी एकटाच आहे. त्याने नवीन पोथीसुद्धा आणली असेल !

ती झपाझप पाऊलें टाकूं लागली !



: ५ :

त्या कॅलेंडरमुळे गजू आणि रामू याची तेढ वाढूं लागली !

शाळेतली गोष्ट आहे ! मुले अव्यवस्थितपणाने इकडे तिकडे फिरत होते ! कोणी डेस्कवर पुस्तकात डोकं खुपसून बसले होते; कोणी आपली बढाई मित्राना सागण्यात गर्क होते; तर कोणी फळयावर वाकड्या-तिकड्या आकृत्या काढण्यात दंग होते. इतक्यात हेडमास्तर वर्गांत येत असल्याची बातमी वाऱ्यासारखी सर्व वर्गांत पसरली. मुलानी आपापल्या बाकावर बसून अभ्यासात गर्क असल्याचे ढोंग केले ! हेड-मास्तर वर्गांत येताच मुलानी पुस्तके काढलीं अन् माना खाली घालून वाचण्यात गुंग झालीं; तोच रामू मधेच उठून म्हणाला,

"मास्तर ! हा गजू मला वाईट वाईट शिव्या देतो."

गजूच्याने राहवेना. तो आपल्या जागेवरच बसल्या बसल्या उत्तरला, "नाही हो मास्तर ! हाच मला 'गजा, तुझी करूं मजा आणि उडवूं पजा' अस चिडवितो !"

रामू म्हणाला, "हें साफ खोटं आहे ! हाच मला चिडवतो."

मास्तरानी अत्यंत जोराने टेबलावर हात आपटून वर्गातील गोंगाट थाबविला ! रामू पुढे बसला होता म्हणून त्याची तक्रार प्रथम ऐकली गेली ! रामू म्हणाला, "मास्तर, तुम्ही जे कॅलेंडर त्या दिवशीं फाडून फेकून दिले होते ना, तसेच आज गजूने आपल्याबरोबर आणले आहे !"

गजू जरा ओशाळला ! घाबरत घाबरत तो मास्तराजवळ गेला अन् कॅलेंडर दाखवित म्हणाला, "मास्तर, हें निराळं आहे !"

संतापाने मास्तरानी ते कॅलेंडर गजूच्या हातातून हिसकावून घेतले. त्याच्या अंगावर खेकसून ते म्हणाले, "आग लावा ह्याला !" आणि त्याच्या थोबाडात त्यानी मारले.

गजूच्या विरुद्धपक्षाची मुले गालातल्या गालात हसूं लागली. गजू काकूळतीनं म्हणाला, "ह्यांत महादेवाचं रंगीत चित्र आहे ते आईला हवं आहे !"

कॅलेंडर भिरकावीत मास्तर म्हणाले, "खबरदार ! पुन्हा शाळेत आणशील तर !"

रामूचा चेहरा विजयश्रीने फुलून गेला. आणि गजूला वाटले की आपण हारलो नाही. आपलं कॅलेंडर सुरक्षित मिळाल्यामुळे गजू आपला झालेला अपमान विसरला ! तरीपण त्याचे आज अभ्यासात लक्ष लागले नाही. वर्गात सर्व उदाहरणे चुकल्यामुळे त्याला पुन्हा मास्तराच्या हातचा मार खावा लागला !

सुट्टी होताच गजू रामूला म्हणाला, "आज आमच्यात जर खेळायला आलास तर तंगडीच तोडून टाकूं तुझी !"

"थांब आता मास्तराना सांगतों !" असे म्हणत तावातावाने रामू पुढे गेला.

गजूने मास्तराना घरी जाताना केव्हाच पाहिलं होतं म्हणून तो निर्धास्त होता.

घरीं येताच गजूने एका कोपऱ्यांत दप्तर भिरकावलें आणि तो खेळाच्या मैदानावर पळाला. रामू आपल्या टोळीत केव्हा येतो अन् त्याची फजिती करतो केव्हा याची तो वाट पहात होता. या धांदलींत दुकानांत जाऊन पोथी आणण्याचे तो पार विसरून गेला. वास्तविक तो दुपारी दुकानावर गेला होता पण मालकाची भेट न झाल्यामुळे त्याने परत संध्याकाळी जाण्याचे ठरविले होते.

क्रीडांगणावर मुलांची टोळी आधीच हजर होती. एक मुलगा

चिंध्याचा चेंडू अन् मोडका पाट घेऊन आला होता. तो म्हणाला, "आज आपण क्रिकेट खेळू या !"

मुलाची आणखी एक टोळी दुसऱ्या बाजूकडे 'सोटापाणी' खेळत होती. एकाला सोट्याचा चागला चोप बसला होता. तो सोटा भिरकावीत म्हणाला, "क्रिकेटनी चागला व्यायाम होतो; आपण पण क्रिकेटच खेळू या !"

इतक्यात सोटापाणी जिंकणारा गडी ओरडला, "डाव पदवून द्यावा लागेल ! नाहीतर प्रत्येकाकडून दहा दहा टप्पू खावे लागतील !" इतक्यात त्या मुलाच्या गुळगुळीत डोक्यावर टप्पू बसायला सुरवात झाली !

गजू मधेच एकदम ओरडला, "आज आपण गाडी गाडी खेळूं !" सर्वांनी उत्साहाने 'कबूल कबूल' म्हणून हात वर केले ! सात डब्याची गाडी करायचे ठरले. डबे बनायला सर्व तयार झाले. कांही उतारूंचे डबे आणि कांही मालाचे ! परीटाचे स्वच्छ कपडे घातलेलीं मुले पहिल्या वर्गाचे डबे अन् बाकीचे क्रमाने दुसऱ्या व तिसऱ्या वर्गाचे डबे बनले. बोडखीं, अस्वच्छ, गबाळ मुले मालगाड्याचे डबे म्हणून मागे लोटले गेले ! डबे तयार झाले पण इंजिन कोण होणार ?

गजू म्हणाला, "मी नाही होणार स्टेशनमास्तर ! मी इंजिनच होणार !"

सर्व मुलें तयार झाली. एका क्षणात सर्व डबे ओळींत उभे राहिले. इंजिनने तोंडाने शिटी फुंकली.

'फक् फक् फक्' इंजिन सुरू झाले पण गाडी हालली देखील नाही. इंजिनालाच ओरडावे लागले की, गाडी सुरू करा ! गाडी चालूं झाली ! गाडी थोडी पुढे गेल्यावर इंजिन थाबलें ! गजू म्हणाला, "आता गाडी परत मागे जाईल ! 'लाईन क्लीअर' नाही. गाडींत माल पण भरलेला दिसत नाही ! गाडी परत जागेवर आली. मुलांनी भराभर जमिनीवरून

काहीतरी भरण्याचा अभिनय केला. गाडीने हात वर केला अन् फक्-फक् करीत गाडी चालू झाली.

"जबलपूर स्टेशन आलं ! गाडी पाच मिनीटं थाबेल !" बाजूचा एक मुलगा म्हणाला. गाडी फक्त अर्धा मिनीट थाबली आणि पाच मिनिटे पूर्ण झाल्याचे सागून गाडी पुन्हा सुरू झाली. जबलपूरनंतर लखनौ, मग पठाणकोट आणि अन् मग एकदम दिल्ली ! "हें फार मोठं स्टेशन आहे. येथे गाडी बराच वेळ थाबेल !" गार्ड म्हणाला.

गजू एकदम ओरडला, "हे दिल्ली नाही, कलकत्ता आहे !"

"हो ! कलकत्ताच !" सारे ओरडले.

'चाय गरम, पुरी, कचौरी, दाल, सेव, भुसावल केला' आदि निर-निराळे आवाज ऐकूं येऊं लागले.

गजूने हुकूम सोडला, "बाजारात जाऊन कोणाला काही आणावयाचें असल्यास आणूं शकता ! खूप वेळ गाडी थाबणार आहे या स्टेशनवर !"

गाडी एकदम अस्ताव्यस्त झाला. आपल्या इच्छेप्रमाणे जो तो फिरूं लागला. गजू अत्यंत दुःखित अंतःकरणाने मनात म्हणाला, "मला कांहीच घ्यावयाचे नाही. मी बाबाचा शोध लावीन." वडिलाचे नाव घेताच, आईची करुणमूर्ति त्याच्या डोळ्यासमोर उभी राहिली.

थोड्या वेळाने सारीं मुलें एकत्र झालीं. गजूने पाहिले तो रामूसुद्धा हजर होता. त्याच्या कपाळात तिडीक उठली. तो म्हणाला, "खबरदार ! गाडीजवळ आलास तर !"

"अडलंय कोणाचं ! शी ! ! गाडी गाडी कुठं अस खेळतात ?" रामू म्हणाला ! "कधी गाडी तरी पाहिली आहे बेट्या !"

हें ऐकल्यावर गजू त्याला मारायलाच धावला ! मोठ्या मुश्किलीने सर्वांनी मिळून त्याला सोडविले.

गाडी पुन्हा सुरू झाली आणि पुढच्या एका स्टेशनवर थांबली. पुरी-कचोरीचा, आवाज ऐकतांच गजूने चड्डीच्या खिशांत हात घातला

तो काय ? तो घाबरला ! "अरे माझे दोन रुपये काय झाले ?" गाडी पुन्हा छिन्नविछिन्न झाली ! आणि सर्व डब्बे त्याच्या भोवती गोळा झाले.

एकाचवेळी अनेक प्रश्नाचीं उत्तरे देणे गजूला अशक्य झालें. रामू पण त्या गोंधळात घुसला ! "कसचे पैसे ? कोणी नेले ?" साळसूदपणाने तो विचारूं लागला.

"रुपये कसचे असतात लेका !" गजू चिडून उत्तरला. रामू शांतपणाचा आव आणून म्हणाला, "का रागावतोस गजू ? मी म्हटलं तुझ्यासारख्या गरीबाजवळ रुपये कुठले आले ? यमुनाकाकूंचे नाही तर शेजाऱ्या-पाजाऱ्याचे चोरले असतील ! मी आता जाऊन यमुनाकाकूंना सांगतों !"

सारी मुलं पैसे हुडकण्यात गुंतलीं होती.

गजू म्हणाला, "मी शाळेत गेलो तेव्हा माझ्या खिशात पैसे होते. त्यानंतर काय झालं हे मला आठवत नाही !"

एक मुलगा म्हणाला, "शाळेत तर नाही कोणी चोरले तुझे रुपये ? एकदा मी त्या रुपयाचा छन् छन् आवाज ऐकला होता ! तो रामू फार बदमाष आहे. सारखा हसत होता !"

रुपये मिळाले नाहीत. सर्व मुले निराश होऊन आपापल्या घरीं गेलीं.

गजू पण उदास अंतःकरणाने एवढस तोंड घेऊन घरीं आला. आईसमोर जायची त्याची हिम्मत होईना.

यमुना आताच शेतांतून परतली होती. आपल्या गल्लींत येताच गजूने पैसे हरवल्याची बातमी तिला कळली. तुळशीपाशीं दिवा लावीत असतांनाच तिला गजूची चाहूल लागली ! या पावलाशीं ती चांगली परिचित होती. चुकणें शक्य नव्हते ! प्रेमळ स्वरात ती म्हणाली, "कोण आहे ? गजू !!"

गजू जागच्याजागींच उभा राहिला. तो चूप होता. त्याने उत्तर दिले नाही.

यमुना त्याचेजवळ जाऊन त्याला म्हणाली, "पैसे हरवलेस का गजू !"

हा स्वर तर रागाचा दिसत नाही ! गजूला वाटलं होतं की आई खूप रागावेल आणि मग मी पण सांगितलं असतं की, "मी मुद्दाम थोडेच हरवले ! इतकं रागवावयाचं होतं तर दिलेच कशाला मला पैसे ?"

परन्तु आईचा तो प्रेमळ स्वर कानीं पडताच तो हुंदके देऊं लागला ! तो एकदम आईला बिलगला ! तो म्हणाला, "आई—" आणि पुढे काहीच बोलूं शकला नाही.

यमुना म्हणाली, "अरे ! हरवले तर हरवले. पण गजू पैसे सांभाळून ठेवावे रे !" यमुनेने त्याला आपल्या पोटाशी घेतले. ती पुढे म्हणाली, "गजा ! रडू नको राजा ! उद्या मीच येईन तुझ्याबरोबर पोथी घ्यायला."

यमुनेचं हळवं मन म्हणालं, 'हरवले तर हरवले दोन रुपये ! गजूला त्याची जाणीव आहे हे काय कमी आहे ! जगात किती तरी वस्तु आपण गमावून बसतो. याच्यांतही एक प्रकारचा आनंदच आहे !'



: ६ :

गजू रोजच्यासारखा उठला अन् म्हणाला, "आई मी नाही जाणार आज शाळेत !"

"कां ? कारण तर सांगशील !"

"मास्तर रागावतात !" तो म्हणाला.

"अभ्यास चागला केला तर मास्तर कशाला रागावतील ?"

"काल रुपये हरवले, म्हणतील कसे हरवले ?"

"चल ! मी चलते तुझ्याबरोबर शाळेत अन् सागते मारूं नका म्हणून !"

"नाही ग आई, मी जातच नाही ! तूं बरोबर आलीस तर आणखी चिडतील !"

"बरं तर ! घरी बसूनच अभ्यास कर आज !"

घरी बसून अभ्यास करणे त्याला मान्य होते. त्याला ठाऊक होते, आई नुसतं आपल्याला वाचायलाच सागणार ! तिला थोडंच शिकवितां येतं ! भीति होती त्याला मास्तराच्या छडीचीच ! ती तर त्याने चुकविली. कारण विद्या म्हणजेच छडी हे त्याचे समीकरण होते.

थोड्याच वेळात त्याला चुकल्याचुकल्या सारखं झालं. दृष्टि पुस्तकात अन् मन मित्रांत ! आजची सुट्टी त्याला दोन रुपयात पडली होती. त्याला असें झाले होतें की केव्हा एकदा मित्राना सागतों की काल आईच्या हातचा मार चुकला म्हणून ! सगळे चिडवीत होते आई खूप चोप देईल म्हणून ! का म्हणून मारेल ? मी काही जाणूनबुजून थोडेच हरवले पैसे ?

हें सत्य प्रकाशात आणण्यासाठी तो ताडकन् उठला. त्याने थोडा आत्मत्याग करायचं ठरवलं ! तो एकदम आईला म्हणाला, "आई ! खायला दे. मला शाळेला उशीर होत आहे !"

"अरे, आताच म्हणालास ना, शाळेत जात नाही म्हणून !" यमुना म्हणाली. गजू गाभीर्याचा आव आणून म्हणाला, "न जाऊन कस चालेल ! चांगली मुलं कधीच शाळा बुडवीत नाहीत. इन्स्पेक्टर साहेब वाटेल तेव्हा येतील शाळा तपासायला !"

यमुनेला गजूची शाळेची कळकळ पाहून मुठभर मांस चढलं. ढोरांना चरायला पाठविण्यासाठी ती ढोरी सोडीतच होती. हातांतले काम तसेंच टाकून ती गजूला खायला द्यायला उठली.

मुलाचं मन एकाद्या तरल पदार्थासारखे असते. म्हणून पाण्यावर मारलेल्या काठीप्रमाणे त्यावर काहीच परिणाम होत नाही. एखादी दुःखाची गोष्ट त्याचे मनावर जास्त वेळ परिणाम करूं शकत नाही. गजूला पाहून अस कोणालाही वाटलं नसतं की त्याचं काही हरवलं असावं ! तोंडात घास कोंबीत गजू म्हणाला, "आई, रामू आला होता का आपल्याकडे ?"

नकार मिळताच तो म्हणाला, "उगाच थाप मारली बेट्यानं ! अन् म्हणे, मी आता जाऊन काकीला सागतों सारं !"

"जाऊ दे रे ! जेव आधी. मला ढोरं सोडायला जायचं आहे !" ती त्रासिकपणे म्हणाली.

पण गजूचं कुठं तिकडे लक्ष होतं ! तो आपल्याच नादात होता. तो रामूबद्दलच्या गंमती सागूं लागला. तो म्हणाला, "ऐक तर खरं त्याच्या एकेक गोष्टी ! मग कळेल तुला तो कसा आहे ते ! तूं उगाच त्याचा कैवार घेतस ! त्याची चागली खरडपट्टी काढावयास हवी. काल मास्तराच्याजवळ माझी चुगली खाल्ली त्यानं ! आज मी पण त्याच्याबद्दल सांगणार आहे मास्तराना ! मग बच्चमजीला चांगला मार पडेल !"

"अरे ! तो मोतीराम पाटलांचा मुलगा आहे गजू ! तूं कशाला उगाच भांडतोस त्याच्याशीं ! आपल्याला त्याचं देणं आहे !" यमुना शांतपणे म्हणाली.

गजू विस्मयाने म्हणाला, "देणं ? मग देऊन टाक ! मी नाहीच कधी भांडत ! विचार रामूला ! पण जर का तो ऐट दाखवूं लागला तर मात्र वटणीवर आणल्याखेरीज राहणार नाही. तुझा नाही तरी स्वभावच आहे मुलाचे लाड करायचा ! त्या दिवशी कॅलेंडर आणलं तर तूं नाही का म्हणालीस, 'माझ्याकडून पैसे घे अन् पाठवून दे.' हे मी गोविंदाला सांगत होतो तर रामू आला नि मधेच म्हणाला, 'तूं मूर्ख आहेस ! मी असतो तर पैशाची मिठाई उडवली असती अन् आईला सांगितलं असतं पाठविले पैसे म्हणून !' असं काही काही शिकवतो तो ! खरंच आई ! एखाद्या दिवशी आपल्या वडिलांनासुद्धा तो फसवेल आणि मग पोलीसाच्या तावडीत जावं लागेल त्याला."

यमुना म्हणाली, "तूं मुकाट्याने खा पाहू आधी !"

गजू म्हणाला, "झालं माझं."

"झालं कस ! काही तर खाल्लं नाही ! तुझं लक्ष असेल तर ना खाण्यात ? चल, मी बसते तुझ्याजवळ ! खा ती पोळी ! दुपारी १२ ला शाळा सुटते ! तोपर्यंत माझ्याच्यानेसुद्धा राहवत नाही." यमुना थोड्याशा रागाने म्हणाली.

"मी काही न खातासुद्धा दुपारपर्यंत राहू शकतो," फुशारकीने गजू म्हणाला. "कां ? खरं नाही वाटत ? लावतें बेट ?" यमुनेने त्याच्या बडबडीकडे लक्ष दिलं नाही. तिने त्याला आणखी पोळी वाढली. "मी अजून चार पोळ्या खाऊं शकतो !" गजू म्हणाला. मिनिटापूर्वीच आपल्याला मुळीच भूक नाही हे प्रतिपादन केल्याचे तो सफशेल विसरला होता. दोन घास गिळल्यावर तो पुन्हा म्हणाला, "आई, माझे रुपये कां हरवले तें ठाऊक आहे कां ? देवाने चांगली शिक्षा दिली मला. मी बाबाच्या जुन्या पोथीला नावें ठेविलीं होतीं ना ? आई, आता मी

नवीन पोथी आणणार नाही ! तीच चांगली आहे !" असे म्हणून गजू आदल्या दिवशीचा प्रसंग सांगूं लागला ! "आम्ही गाडी गाडी खेळत होतो. मुलं म्हणालीं, 'दिल्ली स्टेशन आलं !' मी म्हटलं, नाही ! कलकत्ता स्टेशन आलं !' मुलं खूप खूप खेळणीं विकत घेऊं लागलीं ! मला मात्र बाबाची खूप आठवण झाली. आई ! कालचा दिवस वाईटच होता नाही तरी ! बाबाची पण भेट झाली नाही आणि रुपये पण हरवले."

यमुनेच्या डोळ्यांत अश्रू येऊं लागले. तिने चटकन तोंड वळवलं आणि ती तेथून उठून गेली. तिचं अंतःकरण भरून आलं ! ती मनात म्हणाली, "नाही तरी गजू असल्याच गोष्टी करतो नेहमी !"

या वेळीं गजूने तिला बसण्याचा आग्रह केला नाही.



# : ७ :

हिवाळ्याचे दिवस होते ते ! थंडीने कहर केला होता. अशा एका दुपारीं यमुना उंबरठ्यावर ऊन खात बसली होती. त्याच बरोबर तिचे निवडणेही चालू होते. इतक्यात कुणाच्या तरी पावलाची चाहूल तिला लागली ! पाहते तो केशव ! पदर सावरून ती जरा नीट बसली.

"काय चाललं आहे यमुनाबाई," केशवने विचारलें. यमुना स्तब्ध होती. केशवने पण उत्तराची अपेक्षा केली नव्हती.

खोलीबाहेर एक ओटा आहे ! यमुना नियमित तो ओटा सारवत आणि त्यावर रांगोळी काढते. येणाऱ्या जाणाऱ्याची तीच बसायची जागा ! "मी गावाला गेलों होतों; आजच सकाळी परत आलों ! आल्यावर शेजाऱ्याने सांगितलं की, गजूने पैसे हरविले. किती हरवले पैसे ? कसे हरवले ?" केशवने गंभीरपणाने सारे प्रश्न विचारले.

हेच प्रश्न कितीतरी लोकांनी यमुनेला विचारले होतें. तिला कंटाळा आला होता या प्रश्नांचीं उत्तरे देऊन ! तरी पण ती म्हणाली, "मुलाची जात आहे. धांदरटपणांत पडले असतील कुठंतरी !"

"तो अल्लड आहे पण तुम्ही बायका या अशा कशा ? काही, पैसे दोन पैसे नव्हते ! रुपये मुलांच्या हातात तरी कशाला द्यावे ?" अधिकारवाणीने केशव म्हणाला.

सारं यमुनेने हंसण्यावारी नेलं !

"यमुनाबाई ! तुम्ही हसतां म्हणूनच तर गजू लाडावतो. तुम्ही

बायकांना चुका करायच्या आणि पोरानी भुरदंड भोगायचा हा अगदी खासा न्याय आहे. आपण कांही शेठ सावकार लागून गेलो नाही पैसे मुलाचे हाती द्यायला !"

यमुनेचा चेहरा एकदम गंभीर झाला. केशवने इतक्या अधिकारानं बोलावं हे तिला आवडलं नाही ! पण करणार काय ? चूक होती सारी तिचीच ! उगाच वादावादी करण्यात काय अर्थ ? ती चूप राहिली.

तिला गंभीर झालेलं पाहून केशवने विषय बदलला. तो म्हणाला, "किती मोकळं आहे घर ! पुन्हा नीटनेटकं ! नीटनेटकेपणा तर मोठ्यांच्या घरीं सुद्धा नसतो ! रिकामपणात बाकी चागला उद्योग आहे. पण काही म्हणा एवढं मोठं घर एकट्याला अगदी खायला उठत असेल भुतासारखं ! नाही ?"

"घरात सोन्यासारखा मुलगा असूनही हा एकटं म्हणतो ?" हे शब्द यमुनेच्या अगदी ओटावर आले होते. पण तिने मूग गिळले. पण पुढे ती म्हणालीच ! "भुतासारखं म्हणायलाच आला वाटतं या भूतघरात !" रागाने तिचा चेहरा लाल झाला ! पण तिच्या रागाचा केशवच्या मनावर काहीच परिणाम झालेला दिसला नाही. शिकारी गोळी मारल्याबरोबर ओळखतो की, आपला नेम चुकला की बरोबर लागला. तसेच यमुनेने केशवकडे न पाहताच जाणलं की आपल्या रागाचा त्याच्यावर काहीहि परिणाम झालेला नाही. त्यामुळे एखाद्या निर्दोष प्राण्याला नेम मारल्यावर जसा तो बालंबाल चुकल्यावर आनंद होतो तसाच तिला झाला.

यमुनेला केशवबद्दल आदर वाटत होता. तसेच केशवलाही यमुनेबद्दल आपलेपणा होता. केशव कसाही असो ! आज अडीअडचणीला उपयोगी पडतो ना ! खाणमातींतूनच सोनं निघतं म्हणून सोन्यालाच माती म्हणून फेकून कसं चालेल ? केशव स्वतः कसा का असेना ? पण त्याची शिकवण किती चांगली आहे !

थोडा वेळ विचार करून केशव पुन्हा म्हणाला, "त्या दिवसासारखं आणखी काही स्वप्न नाही ना पडलं ?"

स्वप्नाची गोष्ट निघताच ती बावरली. वास्तविक ती गोष्ट ती मनातच ठेऊं पाहात होती पण त्या दिवशी तिची मनःस्थिति फारच कावरीबावरी झाली होती; आणि म्हणूनच केशवला तिनं सर्व सागितलं होतं ! त्यानंतर तिला तसं स्वप्नच पडलं नव्हतं. म्हणून ती "नाही" म्हणाली.

"हें चागलं लक्षण नाही !" केशव गंभीरपणे म्हणाला. "स्वप्न जर खोटं असलं तर त्या सारखींच तीन स्वप्ने एका महिन्याच्या आत पडतात. नाही पडली तर पहिलं स्वप्न खरं होतं म्हणतात. जे स्वप्न खोटं असेल तेच पुन्हा पुन्हा डोळ्यासमोर येतं ! आणि जे खरं असेल ते फक्त एकदाच दृष्टिसमोर येतं !"

त्या स्वप्नाच्या सत्यतेबद्दल यमुनेचा पण विश्वास बसत चालला होता. तिचा गंभीर चेहरा पाहून केशव म्हणाला, "घाबरूं नका यमुनाबाई ! ईश्वरकृपेनं स्वप्नाचं वाईट फळ बदलता येतं ! ते सर्व मी पाहून घेईन ! हो पण, आज मी दुसऱ्याच एका महत्त्वाच्या कामासाठी आलो हातो."

यमुना ऐकण्यास उत्सुक झाली अन् केशवही काही बोलणार तो कोपऱ्यातून काही विचित्र आवाज ऐकूं आला. केशव जवळ गेला आणि एकदम ओरडला, "अरे ! या ठिकाणी एक मोठा नाग आहे !"

यमुना एकदम घाबरली. "अयाई ऽऽऽ आता कस करूं" म्हणून ती ओरडली. "हा नाग येथे कसा आला ? याच ठिकाणीं गजू नेहमी खेळतों आणि आपलीं पुस्तके वगैरे ठेवतो ! बरं झालं बाई, विघ्न टळलं ! आज कुठे हात-बीत घातला असतां तर·········! देवा, तूंच आहे रे बाबा रक्षण करणारा !"

थोड्याच वेळांत शेजार-पाजारचे लोक जमा झाले. नाग कसा आला, कोठून आला यावर चर्चा सुरू झाली. साप, भुतं अन् चोर या विषयाच्या गप्पागोष्टींना कधी अंत असतो का ! केशवने सापाला पकडून एका मडक्यात बंद केलं !

यमुना या गडबडींत केशव कोणत्या विशेष कामासाठी आला होता हें विचारायला सुद्धा विसरली.



## : ८ :

शाळेंतून घरीं आल्यावर गजूला फार वाईट वाटलं. साप निघाला म्हणून नव्हे तर अशा कुतुहलपूर्ण आणि भयानक प्रसगाचे वेळीं आपण घरीं हजर नव्हतों म्हणून ! साप किती मोठा होता, आधी कोणी पाहिला, लक्ष कसं गेलं, कोणी मारला इत्यादि प्रश्नाचा भडिमार त्याने आईवर केला. त्या प्रसगाची आठवण अजूनही यमुनेच्या अंगावर काटा उभा करीत होती. ती रागानेच म्हणाली, "चूप रहा बरं गजू ! पुरे झाल्या या पंचायती !"

गजू कोपऱ्यात जाऊन बारकाईने पाहूं लागला. नागाने कुठं बीळ केलं आहे काय ? त्याला कुठेच काही दिसलं नाही. बाजूला एक भोक होतं. त्यात तो हात घालणार तोच यमुनेने त्याला एकदम मागे ओढलं अन् एक थप्पड देत म्हणाली, "नसते उपद्व्याप कशाला करतोस गजा बाबारे ! केवढं मोठं सकट टळलं आज !"

"अं ! त्यात इतकं भ्यायला काय झालं आई ? महादेव तर नेहमी आपल्या गळयात सापाचा हार घालतात;" गजू मोठ्या ऐटीनं म्हणाला.

गजूचें म्हणणें ऐकलें न ऐकलें करीत ती म्हणाली, "खबरदार ! पुन्हा अशा उचापती केल्या तर !"

गजूचं चाललंच होतं आपलं पुराण. "मी जर असतों तर नागाला दूध पाजलं असतं ! तूं नाही का त्याला नागपंचमीला वाटींत दूध दिलं होतं ! लहानशा जीभेने तो कसा लप्लप् पीत होता, त्या वेळीं किती छान वाटत होता तो !"

गजूने विषय बदलावा म्हणून यमुना तेथून निघून गेली. थोड्या वेळानं केशवकाकाचा हात धरीत गजू आला अन् म्हणाला, "आई ! काका कुठे बाहेर निघाले होते; मी त्याना पकडून घेऊन आलों ! गोष्ट सांगणार आहेत ते !"

यमुनेने माजघरातून चटई आणली अन् अंथरली. गजू केशवकाकाजवळ जाऊन बसला आणि म्हणाला, "सापाला मारलंत काका ?"

"दूर जंगलात सोडून आलो. मी सापाला मारत नाही कधी !"

"तुम्हाला चावला नाही साप ? मंत्र येतो तुम्हाला ?"

"हो ! येतोना मला मंत्र ! पण गजू कधी कधी कोणताच मंत्र लागूं पडत नाही;" असे म्हणून केशवने यमुनेकडे नेत्रकटाक्ष केले.

यमुनेने लागलीच आपली दृष्टि दुसरीकडे वळविली.

गजू आपल्याच विचारात मग्न होता. तो म्हणाला, "काका ! मला शिकवाल मंत्र ?"

"हो, हो, जरूर शिकवीन ! तूं मोठा तर हो !"

"किती मोठा काका ? तुमच्या एवढा झाल्यावर ? बरं आता गोष्ट सांगता ना ?"

गजू काही दुसरे ऐकत नाही हे पाहून केशव म्हणाला, "हं, ऐक तर ! एका गावात एक बाई राहात होती."

गजू म्हणाला, "हुं !"

"ती दिसायला इतकी सुरेख होती की जणूं राजकन्याच ! पण तिला एक फार वाईट खोड होती ! कोणत्याही गोष्टीचा हट्ट धरला की तो पुरा झाल्याशिवाय ती ऐकत नसे."

"वेडीच होती." गजू म्हणाला.

"मला नाही ठाऊक ! तिला होता एक मुलगा."

"किती मोठा ?" गजूने उत्सुकतेने विचारले.

"तुझ्याच एवढा होता. अन् फार समजूतदार होता. कधी हट्ट करायचा नाही गोष्ट सांगा म्हणून !"

गोष्टीतील सारे स्वारस्य गेल्यासारखे समजून तो काही म्हणणार तोच केशव म्हणाला, "त्याचे नाव होते गजू!"

"ऊं हूं ! आम्ही नाही जा ! आम्हाला अशी नको गोष्ट ! दुसरी सागा; नाही तर आम्ही जातो;" असे म्हणून गजू उठून गेला.

थोड्या वेळ स्तब्धता होती.

नंतर केशव यमुनेला म्हणाला, "मी नेहमी नेहमी येतो म्हणून तुम्हाला वावगं नाही ना वाटत ?"

यमुना काहीच बोलली नाही.

"तुम्हाला वावगं वाटत असेल पण माझ्या मनात काही वाईट पाप नाही हो ! तस असतं तर त्या सापाने मला दंश केला असता आज ! पापाची फळं मिळाल्यावाचून राहात नाही कधी ! त्यातून तुम्ही म्हणत असाल तर नाही येणार बापडा !"

"मी कुठं म्हणते नका येऊं म्हणून !" कंपित स्वरात यमुना म्हणाली.

"मग ठीक आहे. माझ्या मनांत विचार आला, तुम्ही जरी मला रोकलं तरी मी येणारच. माझ्या मनात जर काही पाप नाही तर भीति कशाची आणि कोणाची ? मी स्वतः तुम्हाला पुनर्विवाह करायला सागत असतो, त्यात वाईट थोडंच आहे ! पूर्वापार चालत आलेली पद्धति आहे ही !"

यमुनेला सकाळच्या प्रसंगाची पुन्हा आठवण झाली. तिचं हृदय केशवबद्दल कृतज्ञतेनं भरून गेलं. केशव होता म्हणून केवढं अरिष्ट टळलं ! बरं तर बरं ! नाही तर प्राणाशीच गाट होती ! आणि म्हणून केशवच्या वाचालपणावर ती स्तब्ध होती. नाहीतर तिने चागली काढली असती त्याची. केशवऱ्या बोलण्याकडे ऐकलं न ऐकलं करीत ती म्हणाली, "सकाळीं कोणत्या महत्वाच्या कामासाठी आला होतात तुम्ही ?"

"हो; त्यासाठीच आता आलो आहे पुन्हा ! आठवण आहे मला. कोणी खुशाल विसरो ती गोष्ट ! पण मी काही विसरलो नाही !"

"कोणती गोष्ट ?" तिने उत्सुकतेने विचारलें.

"कोणती गोष्ट ? अरे हो ! तीच ! तीच तर सागतों आहे ! मी एक दिवस सदरमधे गेलों होतों. तिथला ठाणेदार फार सज्जन मनुष्य आहे. काही विशेष गोष्ट असली म्हणजे बोलावणं पाठवितों. कधी कधी चहाही पाजतो. त्या दिवशी असाच फराळाचा आग्रह केला. गोड तर आपल्याला आवडत नाही. दोन चार पुऱ्या खाल्ल्या अन् निघालों कचेरीकडे तो वाटेत बाजारच्या चौरस्त्यावर मारोती भेटला".

यमुना चपापली. मारोती म्हणजे तीच व्यक्ति की जिच्याबरोबर विनायक परगावीं गेला होता.

"मारोती ?" ती एकदम म्हणाली.

"होय ! तो नाही तर कोण ? आता तो बाबू झाला आहे. बाबू म्हणजे कोण ? कसा असतो ? ठाऊक आहे ? हात पाय वेताच्या छडीसारखे; तोंड चोखलेल्या आब्यासारखे ! अर्ध्या टांगा उघड्या दिसतील असें धोतर, अन् बंद गळयाचा गुडघ्यापर्यंत कोट. बाबू हो की साहेब हो ! कोणाच्या डोळयात खुशाल धूळ फेक बेट्या ! पण मला नाही तो फसवूं शकणार ! मी दुरूनच ओळखलं त्याला. माझा दोस्त म्हणाला, 'तो मारोती नव्हे' मी पटकन मारोती म्हणून हाक मारली तो लागलीच आला माझ्याजवळ !"

"मग काही बोलणं झालं ?" यमुनेने अत्यंत आतुरतेने विचारले.

"हो ! नाही तर बोलावलेच कशाला असते ?" केशव म्हणाला; "म्हणत होता; 'तिथलं हवापाणी मानवलं नाही म्हणून आलों परत'. बाबू लोक असेच असतात. फुंकीसरशी उडायला त्याना वेळ लागत नाही ! अन् बुडायला सुद्धा खोल पाणी नको फार ! अन् त्यात आता तर काय मोठ्या शहरांत गेले !" असे म्हणत केशव खो खो हंसूं लागला.

यावेळीं त्याचे हंसणे यमुनेला मुळीच आवडले नाही. ती उत्कंठतेने म्हणाली, "ह्याच्या बाबतींत काही विचारपूस नाही केली ?"

"कुणाच्या ?—विनायकाच्या ? वेळच कुठे होता ? साडेदहा वाजले होते. कचेरी दहालाच उघडते."

यमुना क्षुब्ध स्वरात म्हणाली, "तुम्हाला कशी येणार दुसऱ्याच्या मनाची कल्पना ! मी स्वतः जाऊन सर्व चौकशी करून येईन."

"मला कोणाच्या मनाची कल्पना नसती तर त्या मारोतीला मी बोलावलेच कशाला असते ? हुं ! अन् विनायकाची कोणती गोष्ट लपून आहे तर त्याच्याजवळ चौकशी करूं मी ! तो जर अजून जिवंत असता तर मारोती बरोबर परत नसता का आला ? हा मारोती बदमाष आहे. त्याला आपल्याबरोबर नेलं आणि आपण परतला एकटाच. तुम्हाला हें सर्व ठाऊक आहेच. स्वप्नात......"

यमुना बसल्या बसल्या सारं ऐकत होती. ती एकदम उठली अन् संतापाने म्हणाली, "पुन्हा तेच तुम्हा सर्वांना वाटतं की, माझे सर्व लोक मरून जावेत म्हणजे मी चांगली तुमच्या तावडींत सापडेन. मला सारा डाव समजतों तुमचा ! मी काही इतकी खुळी नाही ? पण लक्षांत ठेवा हो ! असं वाईट चिंतल्याने काही कोणाचे वाईट होत नाही."

मोठ्या संतापाने बांगड्याचा खणखणाट करीत यमुना आंत निघून गेली. ती संतापाने लाल झाली होती.

केशव एकदम विरमला. थोड्या वेळाने तो माजघराच्या दाराजवळ जाऊन म्हणाला, "यमुनाबाई ! रागावलात तुम्ही ? पण खरं म्हणजे रागवावयाचे काही कारण नाही. मी माझ्या स्वतःचे कांहीच सांगितलं नाही. मारोतीने जे सांगितलं ते अभद्र आपल्या तोंडाने सांगवेना म्हणून तसं म्हटलं मी ! तरी तुम्ही म्हणता मला कोणाची काळजी नाही म्हणून ! प्रत्यक्ष मारोतीलाच मी तुमच्यासमोर उभा करतों—मग पटेल की नाही सारं ? बरं आहे ! जातों मी आता !"

आतून काहीच उत्तर आलं नाही.

केशव निघून गेला.

यमुना ढसढसा रडत होती.



: ९ :

मारोतीला आपल्या पतिबरोबर यमुनेने पुष्कळ वेळा पाहिलं होतं. पण आज केशवबरोबर त्याला येताना पाहून ती त्याला ओळखूं शकली नाही. काय त्याचे रूप ? काय तो पोशाख ? काय चालणं बोलणं ! सर्व अगदी पार बदलून गेलं होतं.

केशवने दारात येताच म्हटलें, "हं ! हे मारोतीरावजी आले आहेत !"

यमुनेची मारोतीशीं बोलायची खूप इच्छा होती; पण काय ऐकायला मिळणार आणि काय नाही या भीतीने ती बोलायला घाबरत होती उराशी बाळगलेल्या कोणत्या आशा आकांक्षाचा हा चक्काचूर करायला आला आहे कोणास ठाऊक ?

चोहोकडे दृष्टि फेकीत मारोती म्हणाला, "वा केशव ! हात तर चांगला मारलेला दिसतोय !" इतक्यात त्याला यमुना येताना दिसली. तिने डोक्यावरून पदर घेतला होता. मारोतीने मभावितपणाचा आव आणला आणि तो चूप झाला. यमुनेनं आपलं बोलणं ऐकलं की काय म्हणून नव्हे तर तिच्या त्या सौंदर्याची त्याला कल्पना नव्हती म्हणून ! त्याची ती नजर केशवला लाजीरवाणी वाटली. पण सुदैवाने यमुनेची नजर खालीच असल्यामुळे त्याला थोडं हायस वाटलं ! यमुना येऊन बसल्यावर केशवने कामाची गोष्ट काढली अन् तो म्हणाला, "ह्या म्हणतात, मला कोणाचीच काळजी नाही. तुमच्याजवळ मी विनायकाची चौकशी केलीच नाही. आता तुम्ही समक्षच आलां आहांत तर सांगा सारी हकीकत म्हणजे याचा विश्वास बसेल !"

"काही भूषणास्पद का गोष्ट आहे?" असे म्हणून मारोती पचकन् कोपऱ्यात थुंकला.

केशवला चुपचाप बसलेला पाहून मारोती पुढे म्हणाला, "काय घुबडा-सारखं तोंड घेऊन बसला आहात हो! कोणाला घरीं बोलावलं तर त्याची अशी खातिर करता हो? तुमच्या फायद्यासाठी इथपर्यंत मला तंगड्या तोडीत आणलं आणि आता असाच टरकावून देण्याचा बेत आहे वाटतं?"

मारोती आपल्याच विनोदाला हसूं लागला. केशव मोठ्या पेचात पडला. येथे तर पान तंबाखूची काहीच व्यवस्था नाही! बरं! यमुनेला तरी कस सागावं? त्याने विचार केला की, एकदा विनायकाची हकीकत सांगितली की टरकावतो याला येथून.

आपली मात्रा लागू पडत नाही हे पाहून मारोती यमुनेला संबोधून म्हणाला,

"तुम्हाला काय सांगूं वहिनी? विनायकाने एका अडाणी हमालाशी दोस्ती केली होती. त्याला एक तरुण मुलगी होती. बस! विनायकाने शेण खाल्लं! थोड्या दिवसानी तो हमाल आजारी पडला. खरा आजारी होता की ढोंग होतं कोण जाणे! विनायक त्या दोघाना त्याच्या गावीं पोहचवायला तयार झाला. त्याने स्वतःचे पैसे सुद्धा खर्च करण्याचे ठरविले. लोकात कुजबुज सुरू झाली. त्याच्या गावी गेल्यावर त्याला तेथील पोलिसानी हातकड्या घातल्या व त्याला तुरुंगात टाकलं. तुरुंग मोठा वाईट! पुढे काय झालं हे मात्र काहीच समजलं नाही."

हे सारं ऐकून यमुनेचा जीव गुदमरून गेला. त्याचं शेवटचं वाक्य संपायचे आधीच ती उठून गेली. तिचा म्लान व गंभीर झालेला चेहरा पाहून केशवला फार वाईट वाटलं. चिंता मोठी वाईट! चिंतेसारखा महान् रोग नाही. सारं रक्त पिळवटून मनुष्याला निस्तेज करते. केवढा मोठा शत्रु आहे.

ती आत गेल्यावर केशव मारोतीला म्हणाला, "किती गावंढळ रे तूं! थोडं संभाळून तर बोलावं की नाही माणसानं!"

"हाच तर माझा दोष आहे !" दात विचकून मारोती म्हणाला. "आपल्याला नाही बाबा खोटं नाटं, बनवा-बनवी करून, काहीच्या काही सांगता येत ? जे आत ते बाहेर ! अन् काहो ? ही बाई तरी काय ढोंगी आहे ! काय दुःखाचा आव आणला ! मी चांगलं ओळखतो तिला ! नाटक-तमाशात काम करायचं होतं म्हणावं ! माझ्या डोळ्यात नाही धूळ फेकूं शकणार ! आतापर्यंत काय केलं असेल कोण जाणे ! आव तर पहा केवढा आणला आहे ! हात जोडले बाबा या ढोंगी बायांच्या पुढे !" त्याची वाचालता ऐकून केशवला राग आला. तो म्हणाला, "काय बकतो आहेस तूं मारोती ? घरंदाज बाईबद्दल असे उद्गार ! शहरात जाऊन तूं हे नवे ढंग शिकला असशील याची कल्पना नव्हती मला ! पुन्हा 'ब्र' तर काढ म्हणजे हा माझा सोटा आहे तुझी वृत्तीशी उपटून पाडण्याकरिता !"

मारोती जरा घाबरला ! दात वेंगाडून तो म्हणाला, "काहो राव ? सहज गंमत केली तर त्यात एवढं रागवायला काय झालं !"

केशव रागाने म्हणाला, "ही बनवा-बनवी दुसऱ्याजवळ करा मारोती-राव ! इथं डाळ नाही शिजायची तुमची ! हं ! सभाळून बोलावं माणसानं !"

मारोतीला वाटलं आपला खडा काही लागत नाही इथे । केशवने अगोदरच बाण मारून विजय मिळविला आहे. या ठिकाणीं आपण जर आलों नसतों तर बरं झालं असतं !

केशवच्या डोळ्यातून अश्रू वाहूं लागले. यमुनेची दशा त्याला पाहवली नाही. तो मनात म्हणाला, कशाला मी या हिरवटाला इथे आणून यमुनेच्या मनाला डागण्या दिल्या ! विनायक या जगात नाही हे जरी आपणास पूर्ण पटत असलं तरी आता यमुनेला सांगावं की, मारोती जे म्हणाला ते साफ खोटं आहे ! मीच त्याला 'अस असं, सांग' म्हणून पढवून आणलं होतं. परन्तु केशव हे काहीच सांगूं शकला नाही. व्यथित अंतःकरणाने त्याने घराची वाट धरली.

## : १० :

गजूला आपल्या आईत खूप फरक दिसला ! त्याला वाटलं, आज ती अशी चूप का ? तो तिच्या जवळ गेला तर तिनं झिडकारून दिलं त्याला. शेजारच्या काही स्त्रिया बसायला आल्या होत्या तर त्यांच्याशी पण "आज डोकं दुखतंय" म्हणून पडून राहिली. त्या परत गेल्या काही कुजबुजत ! त्याला कळेनाच काय भानगड आहे ही ! मुलांच्या कडूनच गजूला बातमी कळली. तिथं साऱ्या बातम्या कशा वाऱ्यासारख्या पसरतात ! "यमुनेकडे शहरातून कोणी एक मनुष्य आला होता आणि त्याने विनायक मेल्याची दुःखद बातमी दिली !"

गजूने आपल्या आठवणींत वडीलाना पाहिलं होतं कुठं ? तरीपण त्याला फार वाईट वाटलं ! त्याला वाटलं, आपण खूप जोरजोरानं आक्रोश करून रडावं. पण आईला काय वाटेल ? आई तर मुळीच रडली नाही. उलट अगदी चुपचाप निजून राहिली आहे ती. वास्तविक अस कांही झालं का खूप मोठमोठ्याने रडतात बायका ! आई जर रडली नाही तर लोक काय म्हणतील ? तो आईजवळ गेला अन् म्हणाला, "आई ! बाबाना······"

इतक्यात यमुना त्याच्यावर खेकसली आणि म्हणाली, "आपलं काम कर जा. नुसत्या चौकशा करूं नाही मुलानी ! भलत्या गोष्टीकडे लक्ष कशाला देतो आहेस ?"

तिला काय कल्पना की गजूने आपल्या बाबाच्या मृत्यूची बातमी ऐकली आहे म्हणून !

गजूला वाटलं, आईचं डोकं तर नाही फिरलं! कालपासून कशी विचित्र वागते आहे ती! आज सकाळीं गजूने ताटात पोळी-भाजी तशीच टाकून दिली होती तरी ती त्याला काहीच बोलली नव्हती! एरवी पानात एक तुकडा टाकला तरी किती रागावयाची ती! दुपारीं पाणी घेता घेता ताब्या माटात पडला आणि माठ फुटला तरी सुद्धा ती काहीही बोलली नाही. नुसती पाहातच राहिली ती! बाबा देवाघरीं गेल्याची बातमी ऐकून आई वेडी होणे साहजिकच आहे. अशा अनेक विचारानी व्यग्र झालेला गजू सायंकाळी मैदानावर मित्राच्या घोळक्यांत शिरला.

त्याला पाहताच एक मित्र मधेच ओरडला, "ए, इकडे येऊं नकोस! आम्हाला शिवूं नकोस. नाही तर आम्हाला आघोळ करावी लागेल."

गजू रागाने म्हणाला, "मी इथे सडकेवर उभा आहे! सडक काही तुझ्या बापाची नाही! माझा हक्क आहे येथे उभं राहण्याचा!"

नारायण त्याचा जवळचा मित्र होता. मित्रत्वाच्या अधिकाराने तो म्हणाला, "तुझी आई अशी कशी रे!"

"का? तिनं काय केलं कुणाचं?" गजू रागाने उत्तरला.

"तुझे बाबा वारल्याचे कळले तरी रडली नाही ती हंबरडा फोडून! माझे बाबा वारले ना, तेव्हा माझी आई तीन दिवस सारखी रडत होती, ती जेवली नाही अन् तिनं आघोळ केली नाही. दोन दिवस आधी तिनं छान रंगीत बांगड्या भरल्या होत्या. दुःखात तिने त्या कडा-कड फोडून टाकल्या होत्या."

गजू विचार करूं लागला. नारायण खरं सांगत असावा. त्याने एकदा खूपसे रंगीत काचाचे तुकडे त्याच्या घराजवळ पाहिले होते. तो ते काचापाणी खेळायला उचलणार तोच त्याला कोणीतरी हटकलं होत. त्याला स्तब्ध पाहून नारायणने मोठेपणाचा आव आणीत सल्ला

दिला. “हें बघ गजू! तूं तुझ्या आईला सुतक पाळायला साग! त्यानी फार चूक केली आहे.”

गजूला राग आला त्याचा. “आईला वाईट म्हणतोस ना?” असे म्हणून गजूने कोणताही विचार न करता त्याच्या गालात एक थप्पड मारली आणि त्याने सरळ घरची वाट धरली.

घरीं येऊन गजू कोपऱ्यात मुसमुसून रडूं लागला. थोड्या वेळाने तो मोठमोठ्याने रडूं लागला. तिरसट स्वरात यमुनेने विचारलं, “गजू! काय झालंय रडायला?”

आतापर्यंत दाबलेल्या क्रोधाग्नीचा स्फोट झाला, आणि आ वासून हुंदके देऊन तो ओक्साबोक्सी रडूं लागला. त्याला काहीतरी सागायचे होते पण ‘बाबा, बाबा’ या शब्दाशिवाय काहीच त्याच्या तोंडावाटे पडेना!

यमुना पुन्हा संतापाने खेकसली व म्हणाली “मी काय करूं? नशीब तुझं!” आणि पडवींत चालती झाली. तिच्या स्वरातील कठोरपणा थोडा कमी झाला होता.

काही वेळाने केशव आला. गजू अजून तिथेच बसला होता. त्याचं रडणं जरी थाबलं होतं तरी चेहरा लाल झालेला आणि डोळे सुजलेले दिसत होतेच.

केशवने कुरवाळींत म्हटले, “का! रडलास बेटा! तूं कशाला लाऊन घेतोस इतकं मनाला! अजून तुझं पोर वय आहे! खावं, प्यावं, खेळावं..... ”

गजू म्हणाला, “त्या राजूची आई फार वाईट वाईट बोलत होती. माझे दोस्त म्हणतात, तूं आम्हाला शिवूं नकोस! तुझे वडील वारले आहेत. तुझ्या आईने सुतक पाळायला हवं!”

केशव मधेच म्हणाला, “हट रे वेड्या! काहीतरीच!”

गजू म्हणाला, “बाबा दूर देशात मरण पावले. त्याना किती त्रास झाला असेल! त्याच्याजवळ कोणी नव्हतं! त्याचा जीवाला काय वाटलं असेल?” त्याचे डोळे पुन्हा पाण्याने डबडबून आले.

केशवला विनायकाच्या मृत्युची बातमी ऐकून कांही विशेष वाईट वाटलं नाही, पण गजूच्या अश्रूंनी मात्र त्याचं मन द्रवलं. या लहान बालकाचं छोटस मन किती अंतर पार करून आपल्या बापाकडे धावत गेलं! किती झालं तरी जन्मदाता बापच तो! तो पटकन भानावर आला नि म्हणाला, "कोण म्हणतं रे तुझे बाबा देवाकडे गेले म्हणून? तुझ्या आईने तुला सांगितले?"

नकारार्थी मान हलवीत गजू म्हणाला, "तिला विचारायला गेलो तर ती माझ्याच अंगावर खेसकली."

"मग तूं उगाच कां रडतोस? तुझे बाबा जिवंत आहेत. त्या दिवशीं तूं नव्हता कां सांगत की तुझी आई म्हणत होती, ते लौकरच येणार आहेत म्हणून! हो ना? मग तूं उगाच काळजी कशाला करतोस?" केशव त्याला धीर देण्याच्या दृष्टीने म्हणाला.

"एक मनुष्य आला होता. त्यानेच तर ही वाईट बातमी सांगितली! तो खोटं कसा सांगेल?" गजू म्हणाला.

मारोतीला दोन चार शिव्या हासडत केशवने गजूला पटवून दिलं की मारोतीने आणलेली बातमी साफ खोटी होती. गजूला प्रसन्न करण्याकरिता स्वतःच्या मनाला धोका देण्यात देखील केशवला समाधान वाटले.

गजूला बाबांच्या मृत्यूची बातमी खोटी आहे या पेक्षाही अधिक आनंद झाला आईची बदनामी खोटी आहे याबद्दल! त्याला वाटे आपल्या आईसारखी कोणाचीच आई असणं शक्य नाही. बाबांचा जेव्हा खराखुरा मृत्यू होईल तेव्हा ती इतकी रडेल की नारायणाची आई काय रडली असेल!

"ही बातमी खोटी आहे ना! मी आईला जाऊन सांगतो". गजू प्रसन्न मुद्रेने उठला.

## : ११ :

केशव कितीतरी दिवस झाले यमुनेला भेटला नव्हता. ती मुद्दामच त्याचेशीं बोलायचं टाळीत आहे हें तो ओळखून होता. तरी देखील तो बाहेरच्या बाहेर येऊन गजूशी बोलून चालला जाई.

आज दोघाची बैठक बाहेर निंबाच्या झाडाखाली बसली होती. सध्याकाळ झाली होती पण अजून काळोख पसरला नव्हता. गजू म्हणाला, "काका, अजून गोष्ट सांगायची वेळ झाली नाही का हो ? तुम्ही म्हणत होता ना की दिवसा गोष्ट सांगितली की मनुष्य रस्ता विसरतो. कलकत्त्याचा रस्ता जर कोणी विसरलं तर काय आफत होईल ?"

केशवने विचारले, "कलकत्त्याचाच कां रे ?"

कलकत्त्याशीं आपला काय संबंध आहे हें तो कोणाला सांगू इच्छित नव्हता. आईचं उदास मन अन् खिन्न चेहरा पाहिला की त्याला वाटे आपण सरळ कलकत्त्याची वाट धरावी. मात्र त्याचेजवळ पैसे नसल्यामुळे तो जाऊं शकत नव्हता. आईचा अजून विश्वास बसत नाही, बाबा जिवंत आहे म्हणून ! तसं नसतं तर ती सदैव दुःखी कशाला राहिली असती ? आपल्याशीं तर ती या विषयावर काहीच बोलत नाही. बोलेल तर तिला पटवून देऊं. म्हणून कसही करून आपण कलकत्त्याला जाय-चंच अन् बाबाचा शोध लावल्यावाचून परतायचं नाही !

इतक्यात त्याच्या मनांत आलं आपली ही योजना ऐकून सारे हंसतील. तेव्हा गुपचूप राहिलेलं बरं ! एकदम विषय बदलून तो म्हणाला, "काका, तो पहा एक तारा ! एक तारा राजा पाही !"—

केशव म्हणाला, "तूं आता राजा होणार गजू !"

"आई मला नेहमीच गजूराजा म्हणते ! पण मी खरा राजा थोडाच होऊं शकतों ! पहा काका, किती तारे आहे आकाशात ! मुलं म्हणतात, तारे म्हणजे चंद्राच्या गायी ! रात्रीं साऱ्या एकत्र येतात चरायला !" गजूचे मन कविकल्पनेच्या ओघात विहार करूं लागले. "अहा किती छान आहेत या ! मला जर याचा गुराखी केलं तर याना राखत राखत मी कलकत्त्यापर्यंत जाऊं शकतो."

केशव म्हणाला, "गजू ! ही छान युक्ति शोधून काढलीस तूं !'

गजू निःसकोचपणे म्हणाला, "काका, माझी इच्छा कलकत्ता शहर पाह्यची आहे ! मी एकटा सुद्धा जाऊं शकतो ! त्यात काय मोठंस ! वाटेत मोटमोठ्या नद्या, पर्वत लागतील ! मी आपला एका हातात काठी अन् दुसऱ्या हातात खाण्याचा डब्बा घेईन ! थकणार नाही की भागणार नाही ! मला कोणाची भीति नाही !"

केशवने टाळ्या वाजवीत म्हटलं, "गजू, तूं मोटा धाडशी मुलगा दिसतोस बुवा ! आम्ही पण येऊं तुझ्याबरोबर !"

गजूला आठवलं, आईने पण एकदा अशीच इच्छा प्रकट केली होतीं. आपल्या इच्छेचे सारेच वाटेकरी होऊं इच्छितात तर ! आईला तर त्याने, कलकत्त्याला बायका जात नसतात म्हणून थाप मारली होती. आता या काकाना कस बनवायचं येऊं नका म्हणून ! काही विचार करून गजू म्हणाला, "मी रस्ता विसरेन असं वाटतं तुम्हाला काका ? म्हणून तुम्ही येणार माझ्याबरोबर ? मी मुळीच विसरणार नाही रस्ता ! नकाशांत अगदी छान रस्ता दाखविला आहे !"

केशवने त्याची गोष्ट एकदम पटली म्हणून त्याला सागितले. तो म्हणाला, "हो बाबा ! तूं शिकलेला, मी अशिक्षित, मी काय मार्ग दाखविणार तुला ?"

"काका, मला तुमचा मंत्र-बिंत्र द्या शिकवून ! कधी बाबाना साप वगैरे चावला तर......!"

"हरं हरं ! असं नाही बोलूं ! तुझी आई ऐकेल तर तिला फार वाईट वाटेल !" केशवने इशारा दिला.

"अं हं ! मी तिच्या समोर मुळी नाहीच बोलणार ! तिला फार वाईट वाटतं ! बाबाच्या बद्दल ती चकार शब्द सुद्धा बोलत नाही. अन् मी काही बोलायला गेलो की मला देते झिडकारून ! कधी कधी मला बाबांचा पण फार राग येतो. ते आईला का टाकून गेले ? आता तर आई पण त्याच्यावर रागावली आहे !"

"तुला कसं कळलं ?" केशवने विचारले.

"मला ठाऊक नाही वाटतं ? तुम्ही त्या दिवशीं त्या माणसाला नव्हतं का आणलं ? तो म्हणत होता बाबा वारले म्हणून ! तुम्ही आईला जर समजावलं नसतं तर तिला वेडच लागलं असतं !" गजू मोठ्या अभिमानाने म्हणाला.

"पण तुझी आई तर नेहमीच माझ्यावर रागावते ?" केशवने मुद्दाम विचारले.

"नाही हो ! तिला तर तुम्ही फार आवडता ! ती तुमची फार तारीफ करीत होती." गजू ने शंका निरसन करीत सांगितले. केशवचा चेहरा एकदम खुलला. मोठ्या उत्सुकतेने त्याने विचारले, "काय म्हणत होती ?"

आता मात्र गजूला प्रश्न पडला. आई काय म्हणाली ते त्याला मुळीच आठवेना ! थोडे आठवल्यासारखे करून तो म्हणाला, "तीच सापाची गोष्ट. तुम्ही किती हुशारीने साप पकडला त्या दिवशीं !"

पण याने केशवचें समाधान झाले नाही. ज्या उत्साहाने त्याने कान टवकारले होते तो उत्साह निमिषात पार मावळला. या प्रशंसे-मुळे केशवला विशेष आनंद झाला नाही.

गजूने पुन्हा एकदम विचारले, "काका, तुम्ही राजा होणार आहांत !"

"राजा ? तें कसं काय बुवा ?" केशवने विचारले.

"हो ! राजाच ! लखूची आई माझ्या आईला म्हणत होती की आजकाल केशव तुमचे मंत्री आहेत; ते राजा केव्हा होणार ?" मी त्यावेळीं बाहेर जात असतांना हें सारं ऐकलं ! त्यावर आई म्हणाली होती, ते राजा होतील नाही तर बादशाह ! तुम्हाला कशाला दुसऱ्याची उटाठेव ! असं म्हणून आई झणकाऱ्याने घरात निघून गेली होती." गजूने सर्व कांही सांगितलं.

केशवने दोन्ही हात वर करून आळस देत म्हटले, "मला तुझ्या आईशीं मोतीराम पाटलाच्या बाबतींत कांही बोलायचं आहे ! ती शेतातून परत केव्हा येईल कोण जाणे !"

का कोणास ठाऊक ! पण केशवकडे पाहून गजूला वाटलं की आपण जी गोष्ट आता सागितली ती सागायला नको होती ! याचे कारण मात्र त्याला सांगता येईना !



## : १२ :

मोतीराम पाटलाने चारशे रुपयापेक्षा जास्त रुपये आपल्या नांवें लिहिले आहेत हें ऐकून यमुनेला आश्चर्य वाटलं. ती म्हणाली, "इतके पैसे निघणे शक्यच नाही ! मी दरवर्षी व्याज चुकते करीत आलें आहे."

"पावती घेत होता का ?—"केशवने विचारले.

"हो" तिने उत्तर दिले.

"कोणाला दाखवीत होता का बरोबर आहे की नाही म्हणून ?"

यावर यमुना स्तब्ध राहिली. कोणाकडून पावती मागायची म्हणजे त्यावर अविश्वास दाखविण्यासारखेच नाही का होत ? पावती घेऊन दुसऱ्याकडून वाचून घेणे म्हणजे आणखीनच संकट. तो प्रसंग तिला अजून चांगला स्मरत होता. तिचा किती अपमान झाला होता ! त्या दिवशीं ती स्वतः मोतीराम पाटलाकडे पैसे द्यायला गेली होती. पावती मिळताच तिने येता येता एका ओळखीच्या इसमाला वाचायला दिली !

इतक्यात मोतीराम पाटील तिकडून चालले होते. त्यांच्या नजरेखालून तें चुकलें नाही. ते मोठ्या उपहासाने म्हणाले, "हं ! नीट वाचा ! कुठं खोटी पावती तर नाही लिहून दिली ! हें कलियुग आहे. सावकार बेईमान असतात बरं ! गरजेच्या वेळीं लोकांना उपाशी मरताना पाहून वाचवतों आम्हीच ! आणि त्याचे फळ काय ते हें ! अहो ! तुम्ही असे चुपचाप कां ?" तो मनुष्य पावती परत करीत होता तोंच पाटलाने त्याचेकडून मोठ्याने वाचून घेतली ! अन् त्याचें वाचून झाल्यावर, तेथे इतर होते नव्हते त्या सर्वांकडून ती वाचून घेतली.

रस्त्याने एक इसम चालला होता. त्याला पण हाक मारून बोलावलं आणि वाचायला सागितले. मेल्याहून मेल्यासारखं झालं होते आपल्याला. त्यामुळे यमुना स्तब्ध होती.

यमुनेला स्तब्ध पाहून केशव म्हणाला, "आपण जोपर्यंत पावती वाचून घेत नाही, तोपर्यंत तिची सत्यता आपल्याला पटूं शकत नाही. बायका असाच तर मूर्खपणा करतात आणि मग पुरुषाच्या फंदात सापडतात. आणि धूर्त पुरुष त्याचं वाटोळं करतात. माझ्याशीं तर कोणी चलाखी करा म्हणावं, जेलाची हवा दाखवीन एकेकाला !"

यमुना जरा त्रासिक स्वरात म्हणाली, "पाटील कशाला कोणाला उगाच खोट्या पावत्या देतील ! तुम्ही का उगाच त्याच्याबद्दल गैरसमज करून घेता ?"

केशव कृत्रिम विस्मयाने म्हणाला, "नाही ! नाही ! असं बोललो तर पाप लागेल मला ! पाटील मोठे साधु-पुरुष आहेत !"

यमुना संकटमय परिस्थितींत होती. चोहोबाजूच्या अविश्वास्या जलांत तिचं धैर्याचं बेट फार लहान होतं. त्यावरच ती मोठ्या अभिमानाने उभी होती. तिथे ती चिरकाल टिकेल हें सांगणं कठिण होतं.

यमुनेचे मौन केशवला असह्य झाले. त्याला वाटले की आपण काय म्हटले ते यमुनेला समजले नाही. तिने मोतीराम पाटलाला खरोखरीच एक साधु पुरुष मानला आहे. तो एकदम म्हणाला, "मग उठा ! अन् पेटींतून तोडा द्या आणून ! पाटील खोटं लिहिणार नाही ना ! त्यांना त्यांची रकम दिलीच पाहिजे आपण !"

यमुना म्हणाली, "घरांत कुठं काय आहे अन् काय नाही हें तुम्हींच ध्या ना हुडकून !"

केशव सभावितपणाचा आव आणून म्हणाला, "हें पहा ! तुम्हीं सत्ययुगांतल्या आहांत ! पण हा काल सत्ययुगाचा नाही. कलियुगासाठी कलियुगासारखेचं झालें पाहिजे. तुम्ही जास्त विश्वासाने जर काम घेतलें तर जग तुम्हाला फसवेल."

यमुना कठोर स्वरात म्हणाली, "अस माझ्याजवळ काय आहे की, जग मला फसवेल ! माझ्याजवळ पैसे असते तर मी पाटलाचे देणं नसतं दिलं का ?"

"मग पाटलाने जितका हिशेब केला आहे तितकं देणं तुम्हाला मान्य आहे ?" केशव म्हणाला.

"नाही !" यमुनेने निश्चयपूर्वक उत्तर दिले.

"मग तुम्ही काय करणार ? आताच तर तुम्ही पाटलाचे चारशे पाचशे रुपये देण्याची तयारी दाखविली होती ना ! आणि त्याची हीच तर इच्छा आहे ना ! मी समजलों ! तुम्ही अवश्य फसाल ! मग मी तुम्हाला वाचवूं शकणार नाही ! मीच काय, पण कोणी वकील बॅरिस्टर पण कसा वाचवणार तुम्हाला ! मी सांगितल्याप्रमाणे तुम्ही जर अजूनही वागलात तर काम सुधारूं शकेल !" केशव समजावण्याच्या दृष्टीने म्हणाला.

"तुम्ही सांगाल तस मी करणार नाही तर काय करीन. पाटील मला लुबाडू पाहात आहेत, पण ईश्वर माझा वाली आहे."

"ईश्वर वाली सर्वांचाच नसतो यमुनाबाई ! आधी थोरामोठ्याचा आणि मग उरला सुरला गरिबाचा ! बरं, ते जाऊं द्या ! पण एक गोष्ट लक्षात ठेवा ! पाटलाकडचा मनुष्य पैसे मागायला आला तर त्याला स्पष्ट सांगा की, "मला पैसे द्यायचे नाहीत; हवं तर कोर्टात फिर्याद करा !"

"नाही, अस मी सांगणार नाही." यमुना निश्चयाने म्हणाली.

"नाही सांगणार तर नका सांगू ! तुम्ही अन् तुमचं भाग्य ! माझं काय अडलंय कोणाच्या भानगडींत पडायला !" केशव स्तब्ध झाला.

"तुमची मर्जी. तुम्ही मला मदत करण्याचे किंवा माझी काळजी वाहण्याचें सोडून द्या. प्रत्यक्ष घरचीच माणस सोडून गेलीं, मग तुमचं काय ?" यमुना म्हणाली.

"मी काय करणार ? खरं म्हणजे मी पाटलाला चांगला इंगा दाखविला असता; पण तुम्ही ऐकाल तर ना ! मी असच करणार नाही;

तसच करणार नाही; अस करून कस चालेल ? पाटलाची इच्छा आहे तुमचं शेत आणि विहीर हडप करायची. गावातील चागल्यापैकी जमीन आहे ती ! ” केशव म्हणाला.

“पाहू कशी घेतो माझी जमीन ! मी प्राण देईन पण माझी जमीन देणार नाही ! यमुना निश्चयाने उद्गारली.

“तुम्ही नाही म्हणून कस चालणार आहे यमुनाबाई ! सरकारचे पोलीस येतील आणि घेऊन जातील. तुम्ही माझा सल्ला मानीत नाही. मग मागावून पश्चात्ताप करायची पाळी येईल. पाटलाचे इतके पैसे देणे तुम्हाला कबूल आहे ?”

यमुनेने मानेनेच नकार दिला.

“झालं तर मग ! कळवून द्या तसं त्याला !”

“मी नवा कागद लिहून देईन.” यमुना म्हणाली.

“काय ? नवा कागद लिहून द्याल ? कागद लिहून देण्याचा परिणाम ठाऊक आहे काय होईल ? गजूला मरेपर्यंत कर्जात डांबवाल. त्याच्या गळयाचा फास नेहमी पाटलाच्या हातीं राहील. तो बिचारा दुसऱ्यांच्या शेतात ‘मर मर’ खपेल अन् त्याचं स्वतःचं शेत राहील मोतीराम पाट-लांच्या ताब्यात ! या सावकार लोकांना सगळया कला अवगत असतात. त्याना वटणीवर आणायची कला माझ्याजवळ आहे ! सावकार कितीही दुष्ट असो, त्याचं माझ्यासमोर कांहीहि चालायचं नाही.”

यमुना खूप घाबरून गेली. डोळे पाण्याने डबडबले. ती काकुळत्या स्वरांत म्हणाली, “मी आता काय करूं ! तुम्ही सांगाना काय करावं ते !”

“मी तेच तर सागतों आहे. चुकून कागद लिहू नका ! त्याला म्हणावं खुशाल फिर्याद कर !”

केशव तिला पुन्हा पुन्हा हेंच पटवीत होता. मोकाट सुटलेल्या गाईप्रमाणे तो तिला कांही वेळ आपल्या बरोबर नेत असे. पण मधेच

ती एकदम बिचकत असे. त्याचप्रमाणे यमुना एकदम म्हणाली, "मी असं करणार नाही."

केशव कपाळाला हात लावून म्हणाला, "कर्म माझं ! किती समजावलं मी तुम्हाला ! पुन्हा तुमचं तेच ! कागद लिहून द्याल तर जमीन नेहमीसाठी गेली म्हणून समजा !"

यमुना म्हणाली, "मी कशाला कागद बिगद लिहिण्याच्या भानगडींत पडूं !"

केशव शांतपणाने म्हणाला, "असं, थोडे समजूतदारपणानं घ्या. पाटलाला म्हणावं फिर्याद तर कर. मी कोर्टात असे उलटे सुलटे प्रश्न विचारीन की बाप आठवेल त्याला ! आपल्या इथला मुन्सब फार चांगला आहे ! तो गोरगरिबाचा आणि शेतकऱ्याचा कनवाळू आहे ! त्यांना मी सारी हकीकत सांगितल्यावर ते तुमची वाहवा करतील ! फार सज्जन आहेत ते ! तसेच धार्मिक पण आहेत. रोज पोथी, पुजा, दानधर्म चालतो त्याच्या घरीं ! ते मला चांगले ओळखतात. ते एक दिवस कचेरीत म्हणाले होते, 'केशव, तुम्हाला मंत्रविद्या येते म्हणे ?' मी म्हटल, 'हो साहेब ! येते आपली थोडीशी !' त्याला आनंद झालेला दिसला. यमुनाबाई तुम्ही बेफिकिर राहा ! मी सारं ठीक करतों. आपल्या कडून पाटलाला एक कवडी सुद्धा जास्त मिळणार नाही !"

यमुना उठून उभी राहिली. केशव पण उठला आणि म्हणाला, "ठीक आहे ! पुन्हा येईन तेव्हा बोलूं याबद्दल !"



## : १३ :

यमुना शेतावर जायला निघाली होती ! ती आतल्या दाराला कडी घालीत होती तोंच गज् आला अन् तिच्या कमरेला विळखा घालीत म्हणाला, "कुठे जातेस आई ? शेतांत ना ?"

यमुना प्रेमाने म्हणाली, "सोड गजा; उशीर होईल मला."

"अहा ! अस मोठं दूर जायचं आहे की नाही की उशीर होईल ! दूर तर मी जाणार आहे ! मग तिथून तुला पत्र लिहीन. तुला तर वाचतां पण येणार नाही काय लिहिलंय ते !"

"पुरे बाबा तुझी बडबड. सोड बाबा मला जाऊं दे."

"मला एक आणा दे, मग जाऊं देईन."

"एक आणा कशाला रे !" तिन आश्चर्यचकित होऊन विचारले.

"बन्दरवाला आला आहे आई ! दोन पैसे माकडाच्या खेळासाठी अन् दोन पैसे अस्वलाच्या खेळासाठी ! थाब मी आत्ता बोलावतों त्याला ! फार छान आहे. तुला पण आवडेल तो खेळ ! रामूने दोन आणे दिले होते, पण मी एक आण्यांतच ठरवीन."

"खेळासाठी मजजवळ पैसे नाहीत" असे म्हणत यमुना चालूं लागली.

तिच्या लुगड्याचा पदर पकडीत तो तिच्या मागोमाग गेला. "आई देना ! फार छान खेळ आहे ! तूं पाहशील तर हसूंन हसूंन पोट दुखेल तुझं. एक बंदर लाल टोपी घालून, हातात काठी घेऊन, आपल्या बायकोला आणायला जातो. बायको रूसून बसते. तिला यायचं नसतं.

बंदर तिला काठीने धमकावतो व फरफटत घेऊन जातो. आई खूप मजाच मजा आहे तूं चल ना ? पैसे देऊन खेळ केला की, माझी व त्या बंदर-वाल्याची दोस्ती होईल. तो निरनिराळ्या गावीं भटकतो."

गजू नेहमी कुठेतरी जाण्याचा विचार करीत असतो. आता पण कुठे तरी जाण्याची गोष्ट त्याने काढलीच. हे पाहून यमुना जरा चिंताग्रस्त झाली. ती रागाने म्हणाली, "खबरदार, त्या डोंबाऱ्याशीं दोस्ती केली तर! ती माणसं वाईट असतात. तूं एकदा पाह्यला आहेस ना खेळ ? पुन्हा पाहण्याची गरज नाही."

"रामूने सुद्धा तर पाहिला होता!"

"तो मोठ्याचा मुलगा आहे! प्रत्येक गोष्टींत तू त्याची बरोबरी करूं नाही शकत!" असे बोलून यमुना निघून गेली.

रडकं तोंड करून गजू तेथेच उभा राहिला. रामू मोठ्याचा मुलगा आहे म्हणे. पण त्याच्यात मोठेपणाचे काय गुण आहेत हे मात्र गजूला समजेना. अभ्यासात, खेळात, इतर सर्व बाबतींत आपण त्याच्याहून श्रेष्ठ आहोत हे गजू जाणून होता. त्याने दोन आणे देऊन त्या माकडाचा खेळ करविला तर मी एक आणा देऊन करूं शकतो. पण आई नेहमी रामूचीच बाजू का घेते ? तो हिरमुसला झाला. पलिकडच्या गल्लींतून बंदरवाल्याच्या डमरूचा डम् डम् आवाज ऐकूं येत होता. त्यामुळे तो जास्त बेचैन झाला. त्याने मनाशीं निश्चय केला की आज सायंकाळीं जेवायचं नाही. आईला सांगेन; तुला रामू आवडतो ना! त्यालाच जेऊं घाल; मी नाही जेवणार! एकदा त्याच्या मनात आलं की, बंदरवाल्या-बरोबरच निघून जावं; मग आई करेल काळजी. पण आईने त्या डोंबा-ऱ्याची संगत नको म्हणून सांगितलं होतं! त्याच्या आज्ञाधारी मनात त्यांच्या बरोबर निघून जायची कल्पना जास्त वेळ टिकूं शकली नाही.

चार पाच दिवसानंतर गजू शाळेतून दुपारीं धावत धावत आला आणि थेट स्वयंपाकघरात गेला. यमुना चुलीजवळ आपल्या कामात व्यग्र होती. ती म्हणाली, "अरे, गजा, हात पाय धुवून ये ना!"

गजूने एक आनंदाची बातमी आणली होती. ती सागण्यासाठी तो अधीर झाला होता. तो धापा टाकीत म्हणाला, "माझे रुपये सापडले."

"यमुनेने उत्सुकतेने विचारले. "मिळाले ? कुठे मिळाले ?"

"अजून मला मिळाले नाहीत. रामूने चोरले होते."

आईचा सारा उत्साह मावळला होता, ही गोष्ट गजूच्या नजरेतून चुकली नाही. तो म्हणाला, "घाबरूं नकोस आई ! मास्तर म्हणाले, रुपये मिळतील."

यमुनेने ऐकलं न ऐकलं करीत म्हटलं, "लौकर आंघोळ कर अन् जेवायला ये. बरं, थाब ! हात धुवून मीच तुला चागली आघोळ घालून देते."

आईच्या निरुत्साहाचे कारण त्याला कळेना. मी इतक्या हुषारीने पैशाचा पत्ता लाविला अन् आईला त्याचं काहीच नाही. सारखा बाबाचा विचार करून करून तिचा स्वभाव कसा विचित्र झाला आहे. तो पुन्हा म्हणाला, "मास्तरानी आज रामूची खूप काढली. ते म्हणाले, 'रुपये घरून आणून दे नाहीतर शाळेतून नाव काढण्यांत येईल' !"

यमुना म्हणाली, "अहं ! त्याने नाही चोरले रुपये. स्वतः आपली वस्तु नीट सांभाळावयाची नाही अन् दुसऱ्यावर चोरीचा आळ घ्यायचा ! मास्तराना साग की त्याला शिक्षा करूं नका." तो जागच्या जागीं उभा आहे हें पाहून ती पुढे म्हणाली, "उभा काय आहे ? काढ कपडे, मी लौकर आघोळ घालून देते तुला !"

गजूला आत्ता समजलं की रामू मोठ्याचा मुलगा आहे म्हणून आईच्या दृष्टीने तो चोरी करणार नाही. रुपये मिळाल्याचा त्याला इतका आनंद झाला नसता जितका रामूची करामत आईला कळेल अन् तो कसा आहे याची साक्ष जर तिला पटली असती तर त्या गोष्टीचा !

मास्तरांचा सुद्धा या गोष्टीवर पूर्ण विश्वास बसलेला आहे आणि आई म्हणते की रामूने चोरी केली नाही. तो सतापाने ओरडला, "रामूनें पैसे चोरले नाहीत तर काय मी चोरले तुझे रुपये ?"

"तू कशाला चोरशील माझे रुपये ?" त्याला प्रेमाने कुरवाळीत यमुना म्हणाली, पण लागलीच राकट कठोरता तिच्या चेहऱ्यावर प्रतीत झाली अन् ती म्हणाली, "ज्या दिवशीं तूं चोरी करतोस असं मला दिसेल, त्या दिवशीं मी समजेन की तूं माझा मुलगा नाहीस !"

गजू चूपचाप आईच्या तोंडाकडे पाहात राहिला. आईचे हे सत्य पण कठोर उद्‌गार त्याला फार आवडले. त्यांत रामूबद्दल घृणा होती म्हणून म्हणा किंवा त्यावरून आईचा आपल्याबद्दल अभिमान प्रगट होत होता म्हणून म्हणा !

तो म्हणाला, "मग आई ! तूं चोराची बाजू का घेतेस ? मी आपले रुपये घेतल्यावाचून राहणार नाही."

यमुना म्हणाली, "तूं असच समज की तुझे रुपये हरवले म्हणून. जे हरवलं ते आपलं राहात नाही असंच आपण समजलं पाहिजे." हे शब्द उच्चारतांच तिच्या मनांत आलं, आपलं पण नाही कां कांहीतरी हरवलं ? आपलं हरवलेलं धन पुन्हा आपल्याला मिळालं तर काय ते ध्यावसं वाटणार नाही ?

गजू तावातावाने बडबडत होता. "ते काही नाही ! माझे पैसे मला मिळालेच पाहिजेत. मला कोणाचीही भीति नाही. मी माझे रुपये घेईन !"

यमुना पतीच्या विचारात गुंग झाली होती. गजूची बडबड ऐकून ती एकदम भानावर आली. ती म्हणाली, "गजू ! वाईट मुलाच्या वाईट गोष्टी तूं कां शिकतोस ?"

आईचा राग पाहून गजू मागे हटला नाही. उलट या प्रसंगाने रामूबद्दल त्याच्या मनांत विलक्षण द्वेष निर्माण झाला. हे जमीनदार लोक जुलूम करतात, शेतकऱ्यांना लुबाडतात, पिळतात अन् वाटेल तसा त्रास देतात. ते कांही नाही. मी कां कोणावर दया करावी ? आईचं डोकं कोणास ठाऊक कसं झालं आहे !

कशीतरी आघोळ उरकून गजू पाटावर बसला. सर्व वेळ चोरीच्या विविध गमती तो सागत होता. चोरीचा सुगावा कसा लागला, त्याचे साथीदार कोण होते, त्याचं बिनसलं कस अन् मग त्यानी सारं गुपित कस फोडलं हे सर्व गजूने सागितले. चोरीचं फळ आज ना उद्या मिळेलच. चोरलेल्या रुपयाची त्यानी हलवायाकडून खूप मिठाई आणली होती. चाकू, रबर, शिट्टी इत्यादि वस्तुपण आणल्या. सारे पैसे एकट्या रामूलाच द्यावे लागतील. मास्तर म्हणाले, 'मोठ्याच्या मुलाना शिक्षा पण मोठीच नको का ?' बच्चमजीला शाळेत तर मार मिळालाच. आता घरी मिळेल तेव्हा कळेल !

सारं वर्णन ऐकून यमुनेला पण रामूचा फार राग आला. पण तिने तसं दर्शविलं नाही.

आईचे मौन गजूला मात्र फार बोचलं.



## : १४ :

रविवारची सुटी होती. सहा दिवस धावपळ झाल्यानंतर याच दिवशीं थोडा वेळ रिकामा सापडतो. मुलाना मोठा आनंदाचा दिवस हा ! पण गजूला वाटत होतं की, आज रविवार नसता तर बरं झालं असतं ! त्याला वाटलं रविवार जणूं त्याच्या मार्गात धोंड आहे. रामूजवळ एक दिवस पैसे जास्त राहावे म्हणून टपकला हा रविवार ! कमींत कमी अशा वाईट कृत्यासाठी असहकार दर्शवायला तरी रविवारीं शाळा उघडी असायला हवी !

भूक नसतांही एखादं आवडतं फळ पाहून तोंडाला पाणी सुटतं अन् ते खाण्याचा मोह आवरत नाही, तसच गजूचं झालं.

गजूने आजचा दिवस आपल्या मित्राच्या बरोबर घालविण्याचें ठरविले. आपल्या शेतातील आंब्यांच्या झाडाना खूप मोहोर आला आहे म्हणे ! तो पाहण्यासाठी आपण गेलेच पाहिजे असे त्याने ठरविले.

हंसत हंसत तो आपल्या आईला म्हणाला "आई, तूं आमच्या मास्तरापेक्षा पण कडक आहेस. आज शाळेला सुट्टी आहे; पण तूं थोडीच आंघोळीला बुट्टी देऊं देणार आहेस ? हा बघ, मी आलो आता आंघोळ करून ! तूं तोवर वाढून ठेव ! नाही तर उशीर होईल मला ! लवकर जायचं आहे मला !"

"कुठं जायचं आहे लवकर ?" यमुनेने विचारले.

"खेळायला ! तुला काय वाटलं, मुंबई कलकत्त्याला ? तूं कुठं जाऊं देतेस बाहेर ? माझी तर फार इच्छा आहे बाहेर गावीं जायची !

५

असं कर; तूं मला एकदा दहा रुपये दे. मी पण बाबाच्यासारखा खूप गावोगावीं हिंडेन."

रात्रीपर्यंत जेवणाची निश्चिती करून गजू आपल्या शेतातील आंब्याच्या झाडाखाली जाऊन बसला. झाडाना नवी पालवी फुटली होती, त्यामुळे ती अधिक सुंदर दिसत होती. मुलाचं लक्ष त्या पालवीकडे नव्हतं, कुठं कुठं मोहर आला आहे इकडे ते पाहात होते.

मधेच एक अत्यंत हर्षाने ओरडला, "तो पाहा !"

दुसऱ्याने लागलीच एक ढेकूळ फेकून म्हटले, "अन्, हा पाहा !"

गजूने वर पाहण्याऐवजी ओरडून रुबाबाने म्हटले, "ढेकूळ नका मारूं ! मोहराचे आंबे होतात म्हटलं ! ढेकळानी ते वाईट नाही का होणार ?"

इतक्यात आणखी एकाला एक नवीनच शक्कल सुचली. तो म्हणाला, "त्यापेक्षा मीच झाडावर चढून दाखवतो, कुठं कुठं मोहोर लागलाय तो !" एक आवाजात सर्वांनी नकार दिला, पडायच्या भीतीने नव्हे; पण फांद्या बारीक आहेत, तुटल्या तर आंबे यायचे नाहीत म्हणून ! थोड्याच वेळात सर्वांना खूप मोहोर दिसला. गजू आनंदाने टाळ्या वाजवीत म्हणाला, "बापरे ! किती मोहोर हा ! या सर्वांचे आंबे होणार ! मग काय मजा येईल. इतके आंबे येतील की साऱ्या गावचे लोक खायला आले तरी आंबे पुरतील." आख्या गावाला आंबे पुरतील या एका कल्पनेने त्याची छाती गर्वाने फुलली ! पण लागलीच त्याला गावात रामूही असल्याची आठवण झाली.

"रामू चोर आहे", एक म्हणाला.

लागलीच सारे गरजले, "चोर आहे ! रामू चोर आहे !!"

"अरे गजू, तो काय म्हणाला माहीत आहे तुला ?" दुसरा मुलगा म्हणाला. "तो म्हणतो, तुझ्या आईला त्यांचे हजारो रुपये द्यावयाचे आहेत. दोन रुपये घेतले तर काय झालं त्यात ?"

दुसरा म्हणाला, "गजूच्या आईने रुपये घेतले कशावरून ? कोण साक्षीदार आहे ?"

गजू क्षणभर घोटाळला ! रामूचं म्हणणं बरोबर आहे ! आईकडून त्यानं ऐकलं होतं की, पाटलाचं कर्ज आहे म्हणून ! आणि म्हणून आईचा रामूवर राग नसावा.

तो म्हणाला, "रामूच्या वडिलाचे पैसे आम्हाला देणे असेल, पण त्या साठी रामूने चोरी कशाला करावी ? त्यालाच देवाघरीं शिक्षा होईल !" हे ऐकून सर्व मुले खुश झालीं.

मधेच एक म्हणाला, "अन् रामू म्हणत होता की, गजूचें ते शेत, आंब्याचीं झाडे, विहीर अन् सारं आम्ही हिसकावून घेऊं ! जर त्याच्या वडिलांच्या ताब्यात हे झाड गेलं तर ते त्याचं एक फळ सुद्धा आपणास चाखूं देणार नाहीत."

"त्याचा बाप खाऊं देणार नाही तर त्याचेच आंबे सडतील. इतके आंबे ते एकटे थोडेच खाणार आहेत ? हो की नाही रे गजू ?" एकाने मल्लीनाथी केली.

गजूने जणूं त्याचे म्हणणे ऐकलेच नाही. आपलं हे झाड रामू हिसकावून घेईल हे ऐकून त्याचं तोंड अगदी लहान झालं. आपल्या आईचं या झाडावर किती प्रेम आहे ! कोणी एक पान तोडलेलं सुद्धा तिला खपत नाही. झाडाखालची जागा सुद्धा किती स्वच्छ ठेवते ती ! जस काही स्वयंपाकघरच ! मागच्या वर्षी याच दिवसात तिनं झाडाला कितीतरी पाणी घातलं होतं ! एकदा कोणीतरी म्हटलं होतं, "आता आंबा मोहोरेल. आता पाणी नको त्याला ! नाही तर मोहोर झडून जाईल." ती म्हणाली होती, "किती उष्मा होतो आहे ? माझं झाड अजून लहान आहे ! ते तहानेलं कसं राहील ? नाही आंबे लागले तर न लागोत." गजूला हें सारं आठवत होतं. त्याला आणखी एक प्रसंग आठवला. एकदा त्याला आई म्हणाली होती, "गजू ! हें झाड तुला तुझ्या मोठ्या भावासारखं आहे ! बघ, हे किती सरळ, दाट अन् सुरेख आहे ! अन् तूं या

झाडाखाली दाङगाई करतोस !" हें झाड आपल्या मोठ्या भावासारखं आहे हे ऐकून त्याला फार आनंद झाला होता. आपले बाबा घरीं येत नाहीत आणि आपला हा मोठा भाऊ पण आपला राहणार नाही या विचित्र कल्पनेने त्याचे डोळे भरून आले.



फाल्गुन महिना सपायचे दिवस होते ते. आजूबाजूच्या शेतातील पिकाची कापणी होऊन शेतात ढीगच्या ढीग पडले होते. कुठं बैलाच्या तोंडाना जाळी बाधून धान्याची उडावणी चालू होती. जागोजागी झाडाच्या सावलींत शेतकऱ्याचीं मुलं खेळण्यात गुंग झालीं होतीं. पण गजूला मात्र सर्व ठिकाणी शुकशुकाट वाटत होता. आपलं शेत लुबाडून आपल्याला नागवलं आहे असेच त्याला वाटत होतं.

एक मुलगा म्हणाला, "गजू, तूं इतका उदास झाला आहेस की जणूं रामूने तुझं सर्वस्व खरोखरीच हिरावून घेतलं आहे! जर तो इथे आला तर आम्ही त्याला बेदम चोप देऊं आणि हाकलून देऊं. चला, आपण आता चोर चोर खेळू या !"

गजू एकदम प्रसन्न झाला आणि म्हणाला, "चला! एकदम् कबूल !"

लागलीच खेळासंबंधीच्या गप्पागोष्टी सुरू झाल्या. गजू कोतवाल बनेल अन् कुंपणाच्या पाळीवर बसून राखण करील. एका फादीची पानं काढलीं गेलीं आणि एक छडी तयार झाली. ती छडी तर कोतवाला-जवळ पाहिजे. तो ऐटीत जागेवर जाऊन बसला. दुसरीं दोन तीन मुले चौकीदार बनले.

आता चोर कोण होणार? खेळात देखील चोर होणं आणि चोर पकडणं कांही सोपं काम नाही. त्यांतल्याच एका शेळपट मुलाला 'चोर हो' म्हटल्या बरोबर तो म्हणाला, "मी नाही होणार चोर! चौकीदार मला फटके मारेल !"

गजू म्हणाला, "जो चोरी करेल त्याला पिटायचं नाही तर काय करायचं ? पण एक गोष्ट आहे ! चोरीकरता रुपये नकोत ?"

दुसरा मुलगा म्हणाला, "आपल्या आब्यांचीं पानें म्हणजेच रुपये ! तींच चोराने चोरायची. चौकीदार त्याच्या मागे मागे राहील ! चौकीदार कोतवालाला म्हणेल, "महाराज......"

गजू मधेच एकदम म्हणाला, "आब्याचीं पानं तोडायचीं नाहींत; आंबा मोहोरला आहे."

आणखी एक मुलगा म्हणाला, "कोणी चोर व्हायला तयार नाही आणि चोरण्यासाठी रुपये पण नाहीत. मग खेळात काय मजा ?" इतक्यात एक म्हणाला, 'तो पहा रामू येतो आहे !"

थोड्या वेळात रामू जवळ आला. गजू कोतवाल बनला होता. त्याला चोराची आवश्यकता होतीच. त्यामुळे तो रामूला रोखूं शकला नाही.

रामू पुढे आला अन् म्हणाला, "काय चोर चोर खेळतां आहात ? मी होतों चोर !"

सर्वांना आश्चर्य वाटलं ! रामू गजूशीं भांडला अन् वर त्याच्याशीं खेळायला तयार !

गजूला पण तो चोर झाल्याबद्दल आनंद झाला. मिरची जरी तिखट असली तरी तिची चव घेण्यासाठी आपली जीभ उत्सुक असतेच.

एका मुलाने सांगितले; "हा विजू म्हणतो, मी नाही होणार चोर ! चौकीदार मला मारेल !"

रामू म्हणाला, "हा खरोखरीच भेकड आहे ! कसा गचाळ दिसतो अगदी ! चोरी करणं कुठं ठाऊक आहे याला ? चौकीदार असो, कोतवाल असो, वकील असो—सर्वांच्या डोळ्यात धूळ फेकून पळून गेलं तरच हुशारी नाही तर काय ?"

गजू म्हणाला, "चोरी करण्यात कसली बहादुरी आहे ? तूं चोरी केलीस पण शेवटीं पकडला गेलास ना ! उद्या जर तूं रुपये दिले नाहीस तर मास्तर......"

"अरे ठाऊक आहे रे मास्तर ! मास्तर मास्तर काय लावलं आहे केव्हाचं ! गजू , तूं फार भोळा आहेस ! तुला धडा शिकविण्यासाठी मी हे सारं केलं. मला काय कमी आहे ? माझ्या घरीं रुपयाचा ढीग आहे. तू दोन रुपड्यासाठी इतका जीव काढशील अशी कल्पना नव्हती मला ! तुझ्या दोन रुपयाना कोण विचारतो ? तुझ्या आईकडून तर खूप रुपये घ्यायचे आहेत आम्हाला ! आम्हाला कशाचीही कमी नाही. भिकारडा तूंच आहेस !" रामू म्हणाला.

गजूला जरास ओशाळल्यासारखं झालं. खरंच, दोन रुपयासाठी असे मागे लागणे लाजिरवाणी गोष्ट नाही काय ? म्हणूनच आईला त्याबद्दल राग आला नसावा. आपल्या आईवर इतकं कर्ज असून आपण फक्त दोन रुपयासाठी इतका तगादा लावायचा ! त्याने एकदम मुद्दा बदलला; तो म्हणाला, "तूं कसला मला धडा शिकविणार रे !"

इतर मुलाना खेळाचा हा विलंब आवडला नाही. लवकर खेळ सुरू करा म्हणून ते ओरडूं लागले.

खेळ लटुपटीचा चालला होता. आणि रामू तर खरोखरची चोरी करूं लागला. एका बाजूची आंब्याच्या झाडाची फांदी फार उंच होती. चोर खरोखरीच हातात काठी घेऊन आंब्याची डहाळी तोडीत होता. त्याने कांही पाने तोडलींच. गजू रागाने दरडावतो आहे तोच मली मोठी डहाळी तुटून पडली.

गजू सतापाने ओरडला, "पकडा ! पकडा ! चोराला पकडा. बदमाश कुठला ? डाका मारून चोर पळत आहे."

गजू क्षणभर विसरला की, आपण कोतवाल आहोंत म्हणून ! त्याच काम साधारण चौकीदाराप्रमाणे चोराच्या मागे लागायचे नव्हते. तरी पण गजू त्या चोराच्या मागे धावला. त्याच्या बरोबर काही चौकीदार धावले आणि काही सौंगडी आपले नागरिकत्वाचे कर्तव्य बजावण्यासाठी पण धावले. ते चोर पकडण्यासाठी मदत करूं लागले.

यावेळी चोर आणि पोलीस यात बलवान कोण हें सांगणे कठिण होते. चोर मात्र फार बलवान होता. तो खूप वेगाने धावत सुटला. त्याच्या बरोबर चोरीचा माल पण होता.

गजू खेळ, डाव, सारं काही विसरला. कारण तो जर कोतवालच राहिला असता तर चोर केव्हाच पळून गेला असता. परंतु गजू रामूच्या मागे सारखा धावत होता आणि थोड्या अंतरावरच त्याने रामूला हात धरून पकडले; आणि दुसऱ्या हाताने त्याच्या पाठीत एक जोऱ्याने धबुका मारला.

रामूने एका हातात चोरीचा माल ठेवला आणि दुसऱ्या हाताने गजूला काटेरी झाडात ढकलून दिले. गजूने स्वत:ला बचावण्याचा प्रयत्न केला. इतक्यात रामू पळून जाऊं लागला.

गजूने जवळचा मोठा धोंडा उचलून त्वेषाने म्हटले, "पुढे धाव तर खरं ! हा धोंडाच घालीन टाळक्यात !"

रामूचे प्रत्युत्तर ऐकेपर्यंत गजूचा दगड अर्धी वाट चालून गेला होता.

रामूला जमिनीवर पडलेलं पाहून आसपासची मुलं ओरडलीं, "गजू ! हे काय केलंस तूं ?"

दगड मारल्यावर असा भयंकर परिणाम होईल अशी गजूला कल्पना नव्हती. पण आता काय ? रामूकडे न पाहता तो दुसऱ्या मार्गाने पळत सुटला. दुसरी मुलं पण पळताना दिसलीं.

थोड्याच वेळात तेथे पूर्ववत् शांतता झाली.



: १५ :

गजू निघून गेल्यानंतर यमुना जेऊन खाऊन अंथरुणावर लोळली होती. इकडून तिकडे कूस बदलायची अन् तिकडून इकडे ! मधेच एखाद्या कल्पनेनं तिला असह्य वेदना होत. ज्या आठवणींनी तिला वेदना होत त्या आठवणी तिला गोड वाटत. डॉक्टर नाही का कधी कधी रोग्याच्या अंगात ताप इच्छित ? तिला वाटलं स्वस्थ पडून राहावं. पण सध्याकाळीं गाईचं हंबरणं ऐकून ती भानावर आली. घरातली करती सवरती तीच. अस आळशासारखं पडून कसं चालेल ! शेजारचे पाजारचे म्हणतील ही बाई निजूनच राहते. बरं झालं ! गजूने पाहिलं नाही. ती ताडकन् उठली अन् कामाला लागली.

सध्याकाळचं सारं काम आटोपून एका हातात फेसामुळे पूर्ण भरलेली चरवी आणि दुसऱ्या हातात चिमणी पकडीत यमुना स्वयंपाकघराकडे आली. माजघरात गजूचे दफ्तर पाहून तिला त्याची आठवण झाली. गजू अजून घरी आला नव्हता. बाहेर काळोख पडला होता. तिच्या छातींत एकदम धस्स झालं ! "आज खेळायला जायच्या आधी तो म्हणत होता, मला खूप दूर देशांत भटकायची इच्छा आहे. त्याला मी त्याच वेळीं जर रागावले असते तर बरे झाले असतें. आतापासून जर असले विचार तर मोटा झाल्यावर काय करेल कोण जाणे ! तो पण मला सोडून गेला तर मी काय करूं ?" ती घाबरली अन् त्याच्या शोधार्थ निघाली.

गल्लीच्या वळणावरच तिला राघे भेटला. त्याला तिने बोलावले आणि विचारलें, "गजू कुठे आहे बेटा ?"

"मला ठाऊक नाही काकू ! विज्जूला विचारा ! त्याच्याबरोबर होता तो !"

यमुनेचा आवाज ऐकून विजूची आजी पडवीत आली अन् म्हणाली, "अग ! यमु ! तुझ्या लाडक्याने उधळलेले गुण ऐकले काय ! तरी बाई, मी तुला कितीदा बजावलं कीं, तूं त्याला फार लाडवूं नकोस ! यामुळे मुलं बिघडतात बरं ! मी पुष्कळ मुलं पाहिलीं आहेत पण असा हूड मुलगा माझ्या पाहण्यात नाही आला. माझी गोष्ट जर तूं ऐकली असतीस .."

"काय झालं, आजी ?"

"काय व्हायचं आहे ? कपाळ माझं ! साऱ्या गावाला जे कळलं ते तुला अजून ठाऊक नाही ? तूं 'नाही' म्हणण्यात काय अर्थ आहे ?"

दुरून विजूला येताना पाहून यमुना म्हणाली, "विजू, ऐकलंस का बेटा !"

आजी मधेच ओरडून म्हणाली, "मी काय म्हणते, ते तर ऐकतच नाही !"

"आजी, सागा ना नीट !"

"काय सांगूं ? तुझ्या गजूनी रामूला दगड मारून मारून बेशुद्ध केलं !"

विजू जोऱ्याने ओरडला, "गजूच्या विरुद्ध उगीच खोटं कां ग सांगतेस ? रामू आणि मी आत्ताच तर बरोबर आलो. गजूने दगड मारला पण तो रामूला लागलाच नाही मुळी !"

यमुनेला हायस वाटलं ! ती म्हणाली, "कुठं आहे गजू ? चांगली काढतें त्याची !"

"मला ठाऊक नाही ! पुष्कळ वेळ झाला तो दिसलाच नाही. रामू चोरी करून पळत होता······" विजू म्हणाला.

पुन्हा चोरीबद्दल चर्चा ! यमुना त्याला शोधायला पुढे गेली. ती

म्हणाली, "भीतीमुळे कुठेतरी लपला असेल ! आज चांगली मऊ करते पाठ मेल्याची !"

यमुनेने गजूचा समाचार घ्यायचं ठरविलं पण जेव्हा ठराविक अड्ड्यावर त्याचा शोध लागेना, तेव्हा ती घाबरली. ती मनातल्या मनात म्हणाली, "ये बेटा लवकर घरी ये ! मी काही करणार नाही तुला ! तूं सुद्धा मला सोडून जाणार काय ?"

रात्रीं देखिल तिने, केशवने आणि शेजाऱ्याने कंदील घेऊन सारं गाव पालथं घातलं, पण त्याचा कोठेच पत्ता लागेना !

ती रात्र कशी गेली तें तिलाच ठाऊक !



: १६ :

दुसऱ्या दिवशी सकाळी गजूचे मित्र त्याच्या शोधात निघाले. खेळताना जिथं जिथं तो लपत असे त्या साऱ्या जागा त्यानी पालथ्या घातल्या. गावाबाहेरील झाडा-झुडपातही पण त्यानी त्याचा तपास केला. गावाबाहेरील एका ओसाड जागेत एक विहीर होती; तिथं भुतं येतात म्हणे ! त्या विहीरीच्या सर्व कपारी धुंडल्या. पण गजूचा पत्ता काही लागला नाही. एक मुलगा म्हणाला, "एकदा लपाछपींत गजू झाडाच्या शेंड्यावर जाऊन बसला होता. जेव्हा सारीं मुलं थकली तेव्हा तो खाली उतरला अन् म्हणाला, 'मी एक अशी जागा शोधली आहे की तिथे चार दिवस लपून राहिलों तरी कोणाला पत्ता लागायचा नाही.' कदाचित् झाडाच्या वरती कुठं तरी असेल तो !, चला पाहूं तिथं!"

सारीं मुलं "हो हो" म्हणत गजूला शोधण्यासाठी पळत सुटलीं. रामू पण त्याच्या बरोबर होता. एका झाडाखाली उभा राहून तो ओरडला; "गजू, उतर खाली, मला काही लागलं नाही !" पण काहीच चाहूल न आल्यामुळे दोन मुलं पटकन झाडावर चढलीं, पण तेथेही त्यांची निराशा झाली.

इकडे केशव जवळच्या रेलवे स्टेशनवर तपास लावण्यासाठी गेला होता. त्याला खात्री होती की गजू कुठंतरी पळून गेला आहे. तो नेहमी बाहेर जाण्याच्या गोष्टी त्याचेजवळ काढीत असे. तोही त्यात समरस होत असे अन् त्यात भाग घेई ! केशवने कधी त्याला चुकून असं म्हटलं नाही की, असं करणं वाईट आहे म्हणून ! आणि म्हणूनच गजूच्या पळून जाण्याची जबाबदारी थोड्या अंशाने का होईना

त्याच्यावर होती. जे जे लोक गजूला शोधायला गेले होते ते सारे निराशेने परतले.

एकाने परत येऊन सांगितले; केशव भैय्या वाटेत भेटले होते. स्टेशनवर काही पत्ता लागला नाही; पण वाटेत एक गुराखी भेटला होता. तो म्हणत होता, 'इकडं वीरपुऱ्याकडे एका मुलाला जाताना मी पाहिलं.' त्याने केशव भैय्याची खात्रीच झाली की, तो गजू असावा आणि म्हणून त्याचा शोध करण्यासाठी ते पुढे गेले. माझी पण त्याच्या बरोबर जायची इच्छा होती; पण इकडे माझं काम राहिलं होतं म्हणून मला परतावं लागलं. म्हटलं जाता जाता तुम्हाला निरोप द्यावा. केशव भैय्या सकाळपासून किती फिरताहेत गजूच्या शोधासाठी ! त्याच्या तोंडात पाण्याचा थेंब नाही. मी म्हटलं, 'थोडा वेळ वाण्याच्या दुकानात थांबा आणि गूळ पाणी घ्या, नाही तर तब्यत खराब होईल ना ?' ते म्हणाले, 'तूं माझी काळजी करूं नकोस ! एक दोन दिवस न खाल्ल्याने प्रकृति कांही बिघडत नाही. थांबण्यात वेळ घालविण्यात काय अर्थ आहे ? तितक्या वेळांत मी तीन चार मैल सहज चालेन.' त्याची कळकळ पाहून तर माझे डोळे पाण्याने भरून आले. काकी ! मला खात्री आहे की, केशव भैय्या गजूला घेऊनच परततील. गजू पण किती चांगला मुलगा आहे ! सदा हंसतमुख ! सारे त्याची बातमी ऐकून हळहळताहेत !"

यमुनेच्या डोळ्यांतील अश्रुप्रवाह थोडा मंदावला होता, तो पुन्हा जोरांत सुरू झाला.

गजू घरीं लौकर परत येण्याचीं कितीतरी आश्वासनें अत्यंत थोड्या अवधींत तिला मिळालीं होतीं. मनांत कोणाच्या कांही का असेना ! पण सर्वांच्या तोंडून चांगलेच उद्‌गार निघाले आहेत. धन्नी महारणीपासून तो थेट कुंडली पाहणाऱ्या टोके शास्त्रीपर्यंत सर्वांचं एक मत पडलं. साऱ्यांनी सांगितलं की गजू शक्य तितक्या लवकर परत येईल. पण तो लवकर येण्याचा क्षण केव्हा येणार ? यमुनेला तो एकेक क्षण प्राणमोलाचा वाटत होता. त्या क्षणात काही प्राण उरला नाही असें यमुनेला

वाटूं लागले होते. जणूं त्याला गतीच नव्हती. तिला जिकडे तिकडे अंधारच अंधार दिसूं लागला ! प्रकाशाचा कुठे मागमूसही नव्हता ! तिच्या मनाला विश्रांति नव्हती ! फक्त अस्वस्थता होती ! दुसरे काहीच नव्हते ! मधून मधून कोणी येऊन यमुनेला गोड आश्वासनें देऊन जात. त्यामुळे क्षणभर तिला दिलासा वाटे; समाधान वाटे; अन् दुःख विसरण्याचा ती प्रयत्न करी. पण तीं आश्वासने तिला निरूपयोगी वाटायचीं ! घोर अविश्वास तिच्या साऱ्या आशावर विरजण घाली. तिचा पति अजून एक दिवसासाठीही परत आलेला नाही ! अशा गोष्टीमुळे तिचे मन निरुत्साही होत असे ! तिला वाटूं लागलं, गजू कसला परत येतोय ! ते कुठं आले परत ? कुणास ठाऊक कुठे गेले अन् कुणाच्या मायपाशात अडकले ! मग गजू तर बोलून चालून अजाण पोर ! तो कसा परत येईल ! कसा विश्वास ठेवायचा तिनं या गोष्टीवर ! माया वेडी आहे झालं ! गजूला कोणी फसवेल; कोणी मारेल, पिटेल ! माझ्या सारखी दुर्दैवी मीच ! माझे दुर्दैव फक्त माझ्यापुरतंच असतं तर काही हरकत नव्हती; पण गजूला सुद्धा त्या दुर्दैवामुळे हाल, अपेष्टा आणि कष्ट भोगाव लागत आहेत. आणि त्यामुळे ती अधिक दुःखी होई ! कुठं असेल तो ! वण वण हिंडत असेल एकटा ! वारा, ऊन, पाऊस !! असले विचार तिला भेडावूं लागले.



## : १७ :

गजूसाठी कित्येक दिवस भटकून केशव आज परतला होता. मन उदास होतं त्याचं! परतताना सुद्धा जवळच्या खेड्यात जिथं यमुनेचं नातेवाईक होते तिथं पण केशवने तपास केला होता. त्यालाही घर सोडून पुष्कळ दिवस झाले होते. घरी कामाचा डोंगर उभा झाला होता. शिवाय यमुनेची हकीकत समजणंही आवश्यक होतं. परतताना त्याला सारखे वाटायचं, 'इकडे मी वणवण हिंडतोय आणि तिकडे गजू घरी परतलाही असायचा.' आपल्याला परत फिरणेच इष्ट आहे. जाताना त्याने यमुनेची सारी व्यवस्था केली होती. तिच्या सोबतीला ज्या शेजारणीला त्याने ठेवलं होतं तीच त्याला ओसरीवर भेटली अन् म्हणाली, "आलांत केशव भैय्या! काही पत्ता लागला मुलाचा!"

"पत्ता लागला असता तर एकटा कसा परतलो असतो," असं म्हणत केशव ओट्यावर बसला.

"तुम्ही किती त्रास घेतला? रात्रीचा दिवस केला पण काही उपयोग झाला नाही." असे म्हणत तिने एक पंखा केशवच्या हातीं दिला.

पंख्याने वारा घेत घेत केशव म्हणाला, "मी एवढा फिरलो पण मला खाण्या-पिण्याच्या त्रासाचे काही वाटले नाही. उपवास घडला, त्याचेहि पण काही जाणवले नाही. दुःख होत आहे हें घर रिकामं रिकामं पाहून! किती गोड पोरगा होता तो! नेहमी गोष्ट सांगण्याबद्दल हट्ट करायचा! फार मोठ्या माणसासारखा वागायचा! मला असं वाटतं की, चूक गजूची नाही, यमुनेचीच काहीतरी चूक असावी. तिनेच त्याला

फार धाकांत ठेवण्याचा प्रयत्न केला असावा ! त्याचा बाप ! तो बाप तरी कसला ? त्याचा ठाव न ठिकाणा ! कुणाला ठाऊक मेला आहे का जिवंत आहे ? त्याच्या गोष्टी ऐकून या गजूच्या अंगात वारं शिरलं ! जसं केलं तस भोगलंच पाहिजे आता !"

ती बाई म्हणाली, "यमुताई घरात देवाची पूजा करीत आहे."

"काय करतं म्हणावं देवाची पूजा करून ? हल्ली देव सुद्धा दगडाचे झाले आहेत. पुष्कळ नवस सायास झाले पण झाला का काही फायदा ? माळ घेऊन जप केले ! पण काही उपयोग झाला का ? बायकाना बुद्धि जरा कमीच ! त्या कधी आपला हेका सोडीत नाहीत ! मी तरी काय करूं ? माझ्या हातात होतं तेवढं केलं ! मातीचा पुतळा थोडाच करून आणायचा आहे !" केशव म्हणाला.

"केशव भैय्या कमाल आहे हं तुमची ! कित्ती करता तुम्ही ! कोण कुणाचं करतं या दिवसात ! सारं गाव वाहवा करत आहे तुमची !" ती स्त्री म्हणाली.

केशव म्हणाला, "कसली वाहवा ? लोकाना वाटतं माझ्या मनात काही काळं आहे ! कोणी काहीही म्हणो, आपण आपल्या कर्तव्याला चुकायचं नाही !"

"बरोबर आहे तुमचं म्हणणं केशव भैय्या ! पण काही म्हणा यमुनाबाईनी फार लावून घेतलं आहे मनाला ! त्याच्याकडे पाहवत नाही अगदी !"

केशव गंभीर झाला. त्याने एकदम विचारले, "जीव वगैरे द्यायचं तर बोलत नाही ना कधी ?"

"दुसऱ्याचे मन कोण कस समजणार ? मला पण भीति वाटते बाई ! पहिल्या दिवशींचा प्रसग आठवला की अजून शहारे येतात अंगावर ! रात्रीचे दोन वाजले असतील ! जिकडे तिकडे अंधारच अंधार होता ! माझा नुकताच डोळा लागला होता. तोच कसली तरी चाहूल लागली आणि मी जागी झाले. उठून पाहते तर यमुनाबाई दारात ! मी ओरडून

विचारलें, "हें काय यमुनाबाई ?" त्या म्हणाल्या, "तुला ऐकूं नाही आला आवाज ! 'गजूची आई तूं कुठं आहेस ?' तो पहा ! ऐकलास तूं आवाज ?" त्या भ्रमिष्टासारख्या करूं लागल्या. ते पाहून मी घाबरूनच गेले. तिचे डोकं ठिकाणावर नव्हतं अस दिसून आलं. तिने मला एकदा ढकलूनच दिलं होतं. कुठे विहीरींत उडी न घेवो म्हणजे मिळवली ! सारी रात्र मी देवाचे नाव घेत घालविली."

जरा आवेशाने केशव म्हणाला, "तुम्हाला वाटतं माझी हिंमत खचली म्हणून ! पण गजूला घरी परत आणल्या खेरीज मी स्वस्त बसणार नाही. माझं मन मला सागतं आहे की, गजू दूर गेलेला नाही; तो इथंच जवळपास आहे. कदाचित् यमुनेच्या भीतिने तो लपला असेल कुठेतरी ! यमुना काही कमी नाही. आता रडते आहे, पण सारखं हिडीस फिडीस करायची त्याला. एकदा पोराने डोंबाऱ्याचा खेळ पाह्यला पैसे मागितले होते. पण तिने त्याच्या फाडकन् गालफडात मारली ! वास्तविक असले खेळ मुलं नाहीत तर कोण म्हातारे पाहणार होय ! माझ्याने राहवले नाही. मी काढून दिले पैसे. तर म्हणतो कसा ? 'नको, दुसऱ्याचे पैसे घेऊं नये काका !' समजूतदारपणा पाहा त्याचा ! मी त्याच्या गालावर हळूच टिचकी मारली अन् म्हटले, "हट, वेड्या, मी काही कोणी लोक आहे हो ! आता पत्ता लागल्यावर मी त्याला-आपल्याच घरीं घेऊन जाईन !"

त्या स्त्रीने डोळ्याने खुणावलं—यमुना मागच्या दारीं आहे.

' अं ! असेना ! सर्वांसमोर सांगेन. मला काय कुणाची भीति आहे ? आई झाली म्हणून काय झालं ? अस मुलाला मारायचं होय !" केशव म्हणाला.

ती स्त्री म्हणाली, "का दोष देता तिला ? कोणती जन्मदात्री आपल्या मुलाशीं दुष्टावा करील ! ती आधीच आपल्या दुःखाने अर्धी झाली आहे; अन् वर तुमच्या या डागण्या. आईला लाड करायचा अधिकार आहे अन् मारायचा नाही ? नको बाबा ! असा प्रसग वैऱ्यावर

सुद्धा येऊं नये. पोर लवकर सापडो म्हणजे झालं !" इतकं बोलून तिचे डोळे आसवानी डबडबले.

इतक्यात यमुना माजघरात खांबाला टेकून उभी असलेली केशवला दिसली. तिची ती करुणामय स्थिति पाहून केशवला गहींवरून आलं. तो म्हणाला, "यमुनाबाई, काळजी करूं नका ! मी गजूला शोधून आणलं नाही तर माझं नाव दुसरं ठेवा ! मी त्याची कुंडली पाहिली त्या काशीच्या ज्योतिषाकडून ! त्याचं भविष्य कधी खोटं ठरत नाही ! त्याला दोन रुपये दक्षिणा पण दिली. त्या बाईला तेंच सागत होतों मी इतक्यात !"

यमुनेने क्षीण स्वरांत विचारलं, "कुठं जाऊन आलात इतक्यात ?"

केशवने पुष्कळ गावाचीं नावे सागितली. शेवटचें गाव ऐकून ती म्हणाली, "नवेगावपर्यंत ?"

केशव म्हणाला, "काय करावं ? जावंच लागतं ! पळून जाणारीं मुलं खूप दूर जातात ! आता मी त्याच्या शोधार्थ दक्षिणेकडे जाणार आहे. ज्योतिषी म्हणाले, 'तो उत्तरेकडे गेला नाही हेंच भाग्य समजा. तिकडे गेला तर परत यायची आशा नसते.' आता तसाच शोध करायला हवा. तुम्ही काही काळजी करूं नका."

केशव उठलेला पाहून यमुना माजघरात गेली अन् बाहेर येऊन पैसे पुढे करीत म्हणाली, "हे घ्या !"

"हें काय ?" केशव आश्चर्याने म्हणाला.

"काशीच्या ज्योतिषाची दक्षिणा" यमुना निर्विकारपणे म्हणाली.

"अं, त्यात काय मोठंस ! तुम्ही दिले काय अन् मी दिले काय ? सध्या राहूं द्या. पुढे पाहूं."

यमुना काही केल्या ऐकत नाही हें पाहून शेवटीं केशवने दोन रुपये घेतले.



# : १८ :

काही दिवसापूर्वी यमुनेची एक गाय हरवली होती. मुलाचं दुःख अन् त्यात ही काळजी भरीला. केशव गजूचा आणि गाईचा शोध बरोबरच करत होता. ज्या कोंडवाड्यात गाय असेल असं त्याला वाटलं होतं तिथेच ती सापडली. गाईला बरोबर घेऊन तो दुसऱ्याच दिवशी परतला. गाईचा शोध लावला याबद्दल केशवला समाधान वाटत होतं. पण ऊन सपाटून लागलं होतं म्हणून त्याने गाईला गोठ्यात बाधल्यानंतर झाडाखालच्या खाटेवर अंग टाकले होते.

थोड्या वेळानंतर त्याने यमुनेचा आवाज ऐकला. तो म्हणाला, "यमुनाबाई, ऐकलं का ! कोंडवाड्यात गाईंना उपाशी मारतात. तेथील रखवालदार बदमाष असतात ! गुराढोरांना देण्यापेक्षा ते स्वतःच खातात. आज गायीला चागला चारा-पाणी द्या !"

मानेनेच होकार देऊन यमुना तेथून परतली. केशवाला यमुनेचे मौन असह्य वाटले. त्याला तिचे गोड शब्द ऐकावयाचे होते.

थोड्या वेळाने यमुना तिकडून निघाली तेव्हा केशव कूस बदलत होता. त्याचं कण्हणं तिला ऐकू आलं. ती म्हणाली, "का बरं वाटत नाही का ?" तिने त्याच्या कपाळावर हात ठेवला, "किती गरम लागतं आहे कपाळ ! ऊन तर नाही ना लागलं ?"

केशवने थोड्या वेळ आपले डोळे मिटले. त्याच्या शरीरातून एक गोड शिरशिरी निघाली. तो म्हणाला, "कांही विशेष गरम नाही माझं अंग ! तुम्ही तुमचं काम करा ! असं तर नेहमीच असतें !"

यमुनेने त्याच्या कपाळावर पुन्हा हात ठेवला आणि म्हणाली, "कपाळ गरम तर लागतं आहे ! उघड्यावर निजणं चागलं नाही अशा वेळीं ! उठा, घरात खाट घालून देतें."

"आत फार उष्मा आहे. इथेच थोडा वेळ विश्रांति घेतों. मला घरीं जायचं आहे आता."

जास्त न बोलता यमुनेने एका हातानं केशवला उठवलं आणि दुसऱ्या हांताने खाट आत नेली. त्यावर तिने सतरंजी पसरली. "पडा इथे. जाऊं नका. मी येते आता." असे म्हणत यमुना माजघरात जाऊं लागली.

"कुठे चाललात तुम्ही ? कैरीचं पन्हं करायला ? मला ऊन वगैरे काही लागलं नाही. तुमच्यासारखा वैद्य मिळाला की झालंच ! दुखणं पोटाचं अन् औषध······"

"पोट दुखतंय तुमचं ?"

"हो, नाहीतर काय !" केशव म्हणाला. "आज रविवार ना ! आजच्याच दिवशीं गजू गेला. उपवासामुळे तोंडांत पाणी नव्हतं. आणि चालावं लागल उन्हात. याचमुळे माझं अंग गरम लागत असावं ! आता मी घरीं गेलों की ठीक होईल माझी तब्यत !"

थोडा वेळ स्तब्धता होती.

यमुना म्हणाली, "आज उपास येथेच सोडायचा. आता इतक्यात घरीं जायचं नाही." आणि ती घरात गेली.

दिव्याच्याच उजेडात केशव पानावर बसला. तो म्हणाला, "यमुनाबाई, माझ्यासारखा पाहुणा परवडायचा नाही तुम्हाला ! आणि मी रोज आलों तर !"

"कांही तरीच ! रोज का जेवणार आहात तुम्ही ! आज तुमचा जीव जर घाबरा झाला नसता......"

"देव करो, आणि रोज असेंच डोकं दुखो. तुम्ही डोक्यावर हात ठेवतांच किती थंड वाटलं. तुमच्या हातांत जितका गुण आहे तितका

गुणी वैद्याच्या हातांतही नसेल. मघा वाटलं, तब्यत बिघडली तर उद्या कसं निघायचं ! पण आता छान वाटतंय ! सारी काळजी गेली. तिथे गेल्यावर कितीही ऊन लागलं तरी तें तुमच्या हाताच्या जादूने पळून जाईल. तुमची जादू आम्हालाही सांगा !"

गोड गोड गोष्टी आणि यमुनेची स्तुति करीत करीत त्याने जेवण संपविलें. हात धुवून तो बाहेर खाटेवर लवंडला होता. त्याला लवकर जावयाचे होतें. जाताना तो म्हणाला,

"यमुनाबाई, तुम्ही नाही जेवत ? इतके उपास करूं नका ! नाही तर गजू येईपर्यंत तुम्ही अंथरुणाला खिळलेल्या दिसायच्या !"

"कुठे उपास करते ? भूक लागेल तर ना !" असे म्हणून यमुनेने आपली दृष्टि दुसरीकडे वळविली.

"तुम्ही उपास करता ते जस आम्हाला कळतच नाही. दुःख साऱ्यानाच असते. पण रडून नि डोकं फोडून का गजू परत येणार आहे ? अन्नाला अशी पाठ दाखविणे चांगलं नाही. उठा, घ्या जेवून !"

यमुना अत्यंत हलक्या स्वरात म्हणाली, "काल जेवलें होतें मी ! आज उपवास आहे माझा !"

"आधी जर कळलं असतं मला तर मी पानावर बसलों नसतों. मला कल्पना नव्हती की तुम्ही अन्नाचा असा अपमान कराल ! जाऊं द्या ! तुम्ही काय ऐकणार माझं ! सारं गाव ओळखतं तुम्हाला ! फार हट्टी आहात तुम्ही. एखादी गोष्ट ठरविली की ती केल्याशिवाय तुम्ही राहात नाही. एक गोष्ट सांगतों; उद्या पहाटे मी जाईन. भेट व्हायची नाही. तुम्हाला अज्ञानात ठेवणं बरं नाही. कदाचित् मी परतणार सुद्धा नाही." तो जड अंतःकरणाने म्हणाला.

यमुनेच्या काळजात धस्स झालं. ती म्हणाली, "कांही तपास लागला आहे का ?"

"तसं विश्वास ठेवण्याजोगं कांही नाही. अंदाज आहे नुसता. माझं काही बरं वाईट झालं अन् मी परत आलों नाही तर तुम्ही समजा की, गजू तेथेच आहे. मग तुम्ही पोलिसाची मदत घ्या अन् त्याला घेऊन या. मी जरी वाचलों नाही तरी मुलगा मिळेल ना !"

अत्यंत व्याकुळतेने यमुना म्हणाली, "काही कळलंय कां ?"

"नदी पलीकडे वंजाऱ्याची एक टोळी आहे. मागे त्यांनीच एका पोराला पळवून नेलं होतं. कदाचित् याहि वेळीं...पण ..पण हा नुसता तर्क आहे. गजू जर तेथे असला तर मी त्याला काही झालं तरी सोडवून आणीन. माझा जीव गेला तरी बेहेत्तर." केशव सांगत होता.

"नाही, मी तुम्हाला जाऊं देणार नाही !" ती निश्चयाने म्हणाली.

"जाऊं देणार नाही तर मग कोण जाणार ? साधासुधा मनुष्य थोडीच त्याचा पत्ता काढूं शकणार ?"

"मी जाईन" धीटाईने ती म्हणाली.

"तुम्ही जाणार ! ते लोक कसे डाकू आहेत, माहीत नाही काय ?" केशव संथपणे म्हणाला.

"काही असो; मी तुम्हाला नाही जाऊं देणार ! तुमच्यावर माझा काय अधिकार की मी तुमचे प्राण संकटांत टाकावे. मी तुमचे उपकार आजन्म विसरणार नाही. नातेवाईक सुद्धा करणार नाहीत अशी मदत तुम्ही मला केली. तोंड देखलं बोलणारे पुष्कळ लोक असतात; पण प्रत्यक्ष झिजणारे फार कमी ! तुम्ही दिवस पाहिला नाही; रात्र पाहिली नाही; खूप वणवण हिंडला. मी नुसती घरात रडले; पडले. तुम्ही आता जाऊं नका. तब्यतीची काळजी घ्या. मीच जाऊन पाहतें. नशीब माझं !" अस म्हणून यमुना रडूं लागली.

"मी राजीखुषीने जात आहे ! तुम्ही मला कोण रोकणार ?"

"माझं नशीब तर फुटकं आहे ! दुसऱ्याचे उपकार कशाला हवेत माझ्यावर !" हुंदके देत देत यमुना म्हणाली.

"कसले उपकार यमुनाबाई ! एक फुटकी कवडी सुद्धा तुम्ही खर्च करूं देत नाही मला !"

"तुम्हाला वणवण हिंडायला सांगायला माझा तुमच्यावर काही अधिकार थोडाच आहे ! मला रस्ता माहीत आहे. मी आपली एकटीच जाईन."

"तुम्ही जाल तर काम बिघडेल ! तुम्हाला सांगितलं हाच माझा मूर्खपणा," असे म्हणून केशव गप्प बसला.

"काम बिघडणार नाही असे करा. एकदा तुम्हीच म्हणाला होता ना...?"

"काय म्हणालों होतों मी ?"

"सांगायला मला संकोच वाटत नाही. दुसरं लग्न करायचा सल्ला दिला होता ना ! तुम्हाला जर हें मान्य असेल तर माझ्यासाठी तुम्ही कुठेही जा. मग मी तुम्हाला रोकूं शकणार नाही !"

"मला मान्य नाही ? कस शक्य आहे ? तुमच्या बरोबर लग्न करून मी सुखी होईन ! पण माझ्या नशिबीं कुठं आहे ते सुख ! जाऊं द्या; या वेळीं कशाला तो विषय ! मी सज्जन नसलों तरी इतका दुष्ट खास नाही की अशावेळी काही निश्चित ठरवायला !"

"मान्य नसेल तर आताच स्पष्ट का नाही सांगत ? माझ्याबद्दल कांही वाईट ऐकलं असेल तर तेही सांगून टाका ना ! मग मी तुमच्या-जवळ पुन्हा काही बोलणार नाही."

यमुनेचे अश्रु ढाळणारे नेत्रही केशवला निखाऱ्यासारखे चमकणारे वाटले ! क्षणभर त्याची आशाज्योत भयाच्या झोताने डोलूं लागली. तो लागलीच उत्तरला, "तुमची निंदा, तुमचा वैरी पण करूं शकणार नाही. माझ्या होकाराचं काय ? याहून अधिक आनंदाची बातमी माझ्यासाठी कोणती असूं शकणार ! तुमच्या आज्ञेचीच वाट पाहात होतों मी ! पण मला नाही वाटत की, तुम्ही माझ्यासाठी आपल्या इच्छेविरुद्ध

जावं. तुमच्या खुषींत माझी खुषी आहे. रडूं नका यमुनाबाई!" असें म्हणत केशवने तिचे अश्रू पुसले.

"तुम्ही माझ्या गजूवर इतकं प्रेम करता की, त्यासाठी मी वाटेल ते काबाडकष्ट करायला तयार आहे!" यमुनेला हुंदके आवरेना! ती माजघरांत निघून गेली.

अंगणाच्या एका कोपऱ्यात स्वच्छ चंद्रप्रकाश पडला होता. त्यामुळे तेथील अंधारात सुद्धा एकप्रकारची उज्वलता आली होती.

माजघरातूनच यमुनेच्या रडण्याचे हुंदके ऐकूं येत होते. अन् बाहेर केशव निस्तब्ध उभा होता.



: १९ :

रामूला दगड मारून गजू जो पळाला तो सारखा पळतच सुटला. तो कुठं धावत होता हेंही त्याला ठाऊक नव्हतं. त्यावेळीं त्याला धावणें आवश्यक होते.

मधेच एक जागी तो थाबला. ते एक घनदाट जंगल होतं. तरीही तो पळतच होता.

त्याला वाटलं अजून उजेड आहे. सध्याकाळ झाली की घरीं परतावे. घरीं पोहचेपर्यंत अंधार होईलच. मग चुपचाप ओसरीवर पडून राहू ! सकाळीं आई ओसरीवर येईल अन् आश्चर्याने म्हणेल, "अरे, गजू तर हा इथेच !" या कल्पनेने तो इतका हर्षित झाला की जणूं एखाद्या खेळात तो विजयीच झाला असावा.

या तंद्रींतच तो पुढे पुढे धावत सुटला. त्याला आढळून आलं की तो अत्यंत दाट जंगलात आहे. जवळपास कोणीच नव्हतं ! जिकडे तिकडे झाडेच झाडे ! त्याला वाटलं येथे झाडे तर राहात नाही ना !

थोड्यावेळ थाबून त्याने विचार केला की आपण कोठे आहोंत ! गावच्या आसपासची जागा त्याच्या परिचयाची होती ही जागा त्याला अनोळखी नव्हती. या ठिकाणीं तो पुष्कळ वेळां येऊन गेला असावा. तरी पण या दाट जंगलातून घरीं जाण्यासाठी मार्ग कसा काढावा हें त्याला समजेना ! त्याची स्थिति विचित्र झाली.

आसपास कोणी माणूस त्याला दिसेना ! दूर कांही बकऱ्या चरतांना पाहून त्याला समाधान वाटलं. त्या बकऱ्या उड्या मारून झाडाचीं पानें खात असतांना गजूने पाहिलें. त्याला वाटलं, आपल्याला नक्की वाट सापडेल. उशीर झाला तर काय झालं !

त्याला तेथे पुष्कळ पायवाटा दिसल्या ! पण त्याच्या दृष्टीने त्या सर्वच सारख्या होत्या. तो एका पायवाटेला लागला. पण त्याला सारखी शंका येई की ही पायवाट कांही बरोबर नाही. तरी तो चालला होता. पुढे त्याला एक-उध्वस्त बाग दिसली. झाडे जंगलीं बनलीं होती. भिंति पडलेल्या होत्या. कांही ठिकाणीं चुनावीटाच्या भिंति उभ्या होत्या. पण त्यांच्यावरील छप्पर त्यानी उतरून खाली ठेवले होतें. जिकडे तिकडे गवतच गवत दिसत होते.

बाजूलाच एक पडकी विहीर होती. ती येणाऱ्या जाणाऱ्या वाटसरूंची तहान भागवीत असे ! आपल्या मित्राबरोबर गजू या ठिकाणी खेळता खेळता कितीतरी वेळां आला होता. ही जागा त्याच्या गावापासून कोस-दीड-कोसापेक्षा जास्त नसावी.

विहीरीजवळच्या वडाच्या झाडाखाली कोणीतरी एक बैलगाडी सोडली होती. गाडींतील उतारू विश्रांतीसाठी खाली उतरले होते. त्यातला पुरुष बादलीने विहीरीचे पाणी काढीत होता. एक स्त्री बैलगाडींतून काही सामान-सुमान काढण्यात गर्क झाली होती. दोन मुले खेळण्यांत गर्क होतीं. मुलगा तीन वर्षाचा आणि मुलगी सात वर्षांची असावी. गजू या मुलाच्या खेळात गुंग झाला होता.

मुलगा ओरडला, "आई ! बघ ताई मला मारते !"

आई रागावून म्हणाली, "का ग भावाला मारतेस ?"

" आई ! मारलं नाही ग मी याला ! वाटेतील उष्टी काडी हा उचलून तोंडात घालीत होता म्हणून त्याला मी रागावले." इतकं बोलून ती मुलगी हसूं लागली. गजूला तिचं गोड हसणं फार आवडलं. त्याला वाटलं आपण त्यांच्यांत जाऊन खेळावं !

मुलगा म्हणाला, "आई, मी विहीर खणतों आहे. ताई मला खणूं देत नाही. पाणी लागेल विहीरीला !"

"वा ! खणूं दे त्याला विहीर ! मला फार तहान लागली आहे." असे म्हणून गजू त्यांच्यांत सामील झाला.

एक वाळलेलं लाकूड घेऊन गजूने त्याना विहीर खोदण्यास मदत केली. थोडं खणल्यावर पण जेव्हा पाणी येईना तेव्हा त्यानी एक युक्ति शोधून काढली. वडिलांनी काढलेलं पाणी ओंजळीनं आणून ते त्या खड्डयांत टाकूं लागले. इतक्यात आई आली अन् म्हणाली, "कोण रे हा सामील झाला तुमच्यात! किती गोड मुलगा आहे हा!"

भाऊ-बहिणीबरोबर 'घाणी-माणी' करता करता गजूला घेरी आली अन् तो जमिनीवर पडला. मुलाचा हात धरून तो म्हणाला, "तुम्ही मला वाचवलं! नाही तर मी विहीरींतच पडलो असतो!"

तिन्ही बालकाचे मधुर हास्य त्या वातावरणात उठून दिसलं! त्या मुलाची आई आपल्याकडे प्रसन्न मुद्रेने पाहात आहे हे पाहून परिचयात्मक स्वरात गजू म्हणाला, "काकू! कोठे चालली आहे गाडी?"

"अम्बादेवीच्या यात्रेला!"

हें ऐकून गजूला फार आनंद झाला. खूप मोठी यात्रा भरते तेथे! मागच्या वर्षी रामू गेला होता. तो म्हणाला, "मी पण तेथेच जात आहे. तेथली देवी फार मोठी अन् नवसास पावणारी आहे! जे मागावं ते देते. काकू, याच्या अगोदर तुम्ही कधी गेला होतात काय?"

त्या बाईने आपल्या पतिकडे पाहात म्हटले, "ते जाऊन आले आहेत! बायकाचं कुठे होतं निघणं! गेलं तरी देवीचं दर्शन घडणं मोटं कठीण!"

"मी करवून देईन दर्शन! तुम्ही माझ्याबरोबर चला काकू! त्या देवीजवळ तुम्ही जे मागाल ते ती देते. तिचा प्रतापच असा मोठा आहे." गजू म्हणाला.

त्या बाईच्या नवऱ्याने म्हटले, "फार वेळ झाला. आता पावेतों मागची गाडी यायला हवी होती. मी येतों पाहून काही तुटलं-बिटलं असेल तर!"

त्या स्त्रीचं तिकडे लक्षच नव्हतं! सारं लक्ष गजूच्या बोलण्याकडेच होतं. तिचा नवरा मागची गाडी पाहण्यासाठी निघून गेला होता.

थोड्या वेळाने दोन पोलिसाना आपल्याकडे येताना पाहून तिला आठवलं की, आपला नवरा अजून परतला नाही. हीं माणसं कांही विचारतील तर त्याना उत्तर तरी काय देऊं !

पोलीस जवळ येण्याच्या अगोदरच मुलगा आणि मुलगी आईजवळ जाऊन उभे राहिले. गजू हिमतीने म्हणाला, "भिता कशाला ? हीं तर नाक्यावरचीं माणसं !"

गजूच्या या माहितीनं त्या बाईला पण धीर आला जरा ! तिला मागील एक प्रसग आठवला. एकदा अशीच संध्याकाळ झाल्यामुळे पोलीसानी गाडी अडवली होती. जेव्हा हातावर दक्षिणा दिली, तेव्हा पुढे जायला मिळाले होते; आज जर तशीच वेळ आली तर पंचाइत होणार आहे !

"गाडी कुठे जाणार ?" कर्कश अन् ताठर स्वरात एका पोलीसाने पृच्छा केली.

"राम राम जमादारसाहेब !" गजू म्हणाला. "गाडी अंबादेवीच्या यात्रेला जात आहे !"

दुसऱ्या शिपायाने काही कुजबूज केली.

पहिला शिपाई म्हणाला "जाऊं द्या गाडी ! अजून पुष्कळ दिवस आहे !" शिपाई जाऊं लागले. गजू म्हणाला, "राम राम जमादार-साहेब ! हा मुलगा तुम्हाला फार भितो ! याला बरोबर घेऊन जा !" व त्याने त्यांना नमस्कार केला.

एक पोलीस हंसत हंसत म्हणाला, "मुलगा मोठा चंट दिसतो आहे !" आणि ते दोघेही पुढे गेले.

त्या स्त्रीला हायसं वाटलं ! पोलीसांशीं निर्भिडपणे बोलणारा मुलगा अजून तिने पाहिला नव्हता. आपल्या पतिकडूनसुद्धा तिने अशी अपेक्षा केली नव्हती.

थोड्या वेळाने दुसऱ्या गाडीबरोबर तिचा नवरा आला. गाडी जुंपली गेली. गजूसहीत ती सर्व मंडळी पुढच्या प्रवासास लागली !

## : २० :

आसपासचीं सारीं गावं पालथी घालून केशव थकून भागून परत आल्यावर त्याला गजू परतल्याची बातमी कळली. यमुनेकडे येऊन पाहतों तों मुलांच्या घोळक्यात गजू आपलें यात्रा-वर्णन करण्यांत गुंग झाला होता.

केशवला पाहिल्यानंतर मुले ओरडली, "काका आले! काका आले!"

केशव हंसत हंसत म्हणाला, "तुम्हीं असे ओरडता आहांत की जणूं काय मीच हरवलों होतों, अन् तुम्हीं मला शोधून काढलं!"

केशवच्या कमरेभोवती हात टाकून गजू म्हणाला, "काका! तुम्ही त्या वंजाऱ्याकडे कशाला गेला होता? त्यांनी जर तुम्हाला ठार मारलं असतं तर!"

"ठार मारलं असतं तर फार छान झालं असतं! पण गजू तूं फार त्रास दिला आम्हा सर्वांना!" असें म्हणून त्याने गजूच्या गालात एक हळूच चापटी मारली.

"काका, तुम्ही लौकर परत आलांत म्हणून ठीक झालं. नाही तर यमुनाकाकू तुम्हाला शोधायला निघाल्या होत्या." रामूने हजर होऊन म्हटले.

"अरे वा! तुम्ही पण आहांत वाटतं!" केशवने उपहासाने विचारलें.

गजू म्हणाला, "काका! रामूला रागावूं नका! आम्ही आता बोली केली आहे. त्या दिवशीं त्याने मला नव्हती शिवी दिली काका! त्या

कोतवालला दिली होती. मी कोतवाल बनून त्याचे मागे धावत होतों ना !"

रामू म्हणाला, "गजूने सुद्धा मला नव्हतं मारलं ! चोराला मारलं होतं. चोराला अशीच शिक्षा हवी." रामू म्हणाला.

गजूचे कोडकौतुक करून केशव स्वयंपाकघराजवळ जाऊन उभा राहिला. यमुना कढईत काहीतरी परतत होती. तिचा पदर घसरला होता आणि तिच्या पांढऱ्या फटफटींत चेहऱ्यावर घर्मबिंदु चमकत होते. बाहेर कोणाची तरी चाहूल लागतांच तिने आपला पदर सावरला.

तो म्हणाला, "मी म्हणत होतो ना की गजू लवकर परतेल म्हणून ! देवाची कृपा आहे. परमेश्वर साऱ्यांना तारणारा आहे. केव्हा आला गजू ?"

यमुना म्हणाली, "सकाळींच आला."

केशव म्हणाला, "त्याला तुम्ही आता मारूं नका !"

यमुना केशवजवळ आली आणि तिने त्याला वाकून नमस्कार केला. केशवला सकोचल्यासारखं झालं ! त्याला वाटलं की, जी वस्तु आपल्या पायाना स्पर्श करीत आहे, तिला आपल्या हृदयात महत्त्वाचें स्थान आहे. तो म्हणाला, "हें काय यमुनाबाई, मी काही विशेष केलं नाही."

"मी काही तसं म्हणणार नाही ! वाटल्यास तुम्ही खुशाल म्हणावं तस ! वास्तविक तुम्ही त्याच्यासाठी काय करायचं बाकी ठेवलं आहे ? आणि म्हणूनच परमेश्वराने त्याला परत पाठविलं आहे. देव अंतर्यामी आहे ! मनुष्य दुःख किती सहन करूं शकतो हें परमेश्वर पाहतो. सुखासाठी दुःखाचं फार मोठं मोल द्यावं लागतं ! तुम्ही जर इतकं केलं नसतं तर माझ्या नशीबात काय होतं कोणास ठाऊक ! मी खरोखरीच फार दुर्दैवी आहे. माझ्या पदरीं नेहमीच अपयश ठरलेले !"

हुंदक्यानी तिचा गळा भरून आला. तिच्याने पुढे बोलवेना !

: २१ :

केशवला कल्पना नव्हती की आपण यमुनेसाठी इतकं काही करूं शकूं ! यमुनेकडे तो न कळत ओढला गेला होता. ते आकर्षण कदाचित् तिच्या रूपामुळे असेल. एखाद्या निर्जन वनात हिंडता हिंडता मधेच एकदम झुळझुळ वाहणारी नदी दिसावी, तिच्या लोभानं पाण्यांत उडी टाकावी, पण तत्काल थंडीने अंग थरथर कापावं अन् बाहेर निघावं, तशीच स्थिति झाली त्याची.

सर्वांत पहिला धक्का त्याला जयरामने दिला होता. यमुनाबद्दलचे त्याचे अपमानास्पद बोलणे त्याला आवडले नव्हते. त्याला त्याबद्दल चागला चोप द्यावा असेही त्याला वाटले होते. जयरामला काय ठाऊक की केशवला यमुनेबद्दल किती आदर होता ! त्याच्या तोंडीं कोणीं लागायचं ! तो पडला शहरीं माणूस ! त्याला वाटलं आपल्या गैरहजेरींत येथे येऊन तो काही वाईट प्रकार न करो ! बोलणाराचे तोंड कोण धरणार ! हें असं चालायचंच !

गजू पळून गेला त्या दिवशीं, हक्कानं ती आपल्यालाच म्हणाली ना मदतीसाठी ! आपलं डोकं जड झालं होतं तेव्हा डोक्याला हात लाऊन ती म्हणाली, "आंत चला···" या अन् अशा असंख्य विचारांनी तो सुन्न झाला. एकदा त्याला वाटे, यमुना बदलून तर जायची नाही ना ! बदलणं अशक्य नाही. कोणी कान भरवले तर फिसकटलं सारं ! त्या मोतीराम पाटलाच्या भानगडींतून तिला मुक्त केलं की, आपोआपच तिला आपला आधार वाटेल. पण काही गोष्टी तिला पटतच नाहीत. तिला

हजारदा सांगितलं की कागदपत्रात लबाडी आहे म्हणून. पण ती ऐकायला तयार नाही. चांगुलपणाची ती साक्षात देवता आहे. तिला वाटतं सारं जग आपल्यासारखंच चांगलं आहे. तिची विहीर तिच्या ताब्यातून गेली तरी तिला त्याचं काही नाही. तिच्या घराचा लिलाव झाला तर झाला. त्याबद्दलही खंत नाही. तिच्या जवळ या सर्वांहून अधिक मोलाची वस्तु आहे. ती कोणी हिरावून घेऊं शकत नाही. मोह, लोभ, भीति इत्यादि सारे विकार थकतील पण तिचा निश्चय अढळ राहील !

केशव कितीतरी वेळ या विचारतंद्रींत होता. मग त्याने ठरविलं की, घाई करण्यात अर्थ नाही. सारं काही दमादमाने घेतलं पाहिजे.

आज सकाळीं केशव जेव्हा यमुनेकडे गेला तेव्हा ती ज्वारी निवडीत होती. त्याची चाहूल लागतांच तिने आपला पदर सावरला होता. त्याने गजूकडे पाहून म्हटले, "कोणीहि आमच्याशीं बोलायला रिकामा दिसत नाही ! आम्ही जातों."

बाजारातून आणलेल्या टीपकागदाची घडी करण्यांत गजू गुंग झाला होता. त्यातील एक तुकडा त्याने आपल्याकरिता ठेवला आणि बाकीचा टीपकागद लपवून ठेवला. लगेच धावत धावत तो बाहेर आला आणि केशवला पकडून म्हणाला, "तुम्ही कसे जाल काका ? मी आलों पकडायला !"

"बरं ! पकड पाहूं ! मी धावतों. पाहतो कसे पकडतो !" केशव म्हणाला.

"लावता बेट ?" गजू म्हणाला.

"नाही रे बाबा ! बेट लावायला माझ्याजवळ पैसे नाहीत रे ! आता मी झालों म्हातारा. मिठाई खाण्यासाठी तूं बेट लावीत आहेस ! नको रे बाबा ! मी तुझ्याशीं बेट नाही लावूं शकत !"

"हट् तुम्ही कसले म्हातारे ! तुमचा एक केस पण अजून पांढरा झालेला नाही !"

"कांही म्हातारे असेच असतात. तुझ्या आईचे पण केस पांढरे झाले नाहीत अजून ! पण ती काय म्हातारी नाही ? जाऊन विचार बरं तुझ्या आईला."

गजूने प्रतिकारात्मक उत्तर दिलें; "काका ! माझ्या आईला म्हातारी म्हणूं नका ! म्हातारीं माणसं मला आवडत नाहीत. सारखीं खाव-खाव खोकलत असतात."

यमुना सारं ऐकत होती. ती हसली अन् म्हणाली, "गजूला विजूच्या आजीचा फार राग येतो. सारीं मुलं तिला चिडवतात. काय रे गजा, मी म्हातारी झाले म्हणजे तूं पण तसच करशील का ?"

केशव काही बोलणार होता. पण गजूच एकदम म्हणाला, "नाही आई ! तूं तशी कधीच होणार नाही. ती बुढ्ढी तर सारखी मुलावर ओरडत असते."

पुन्हा विषय बदलून गजूने केशवचा हात धरला अन् म्हटले, "काका, इथे बसा अन् एक गोष्ट सांगा !"

"ऊं हूं ! इथे नको. बाहेर निंबाखाली ! तुझी आई रागवेल;" तो म्हणाला.

"इथेच बसूं आपण ! आई काही रागावणार नाही." गजू बोलला.

"रागवेल ! तिने तर मला बसण्याकरिता म्हटलंच नाही !" केशव म्हणाला.

"रागावशील आई ?" गजूने विचारले.

यमुनेने मान डोलवून 'नाही' सांगितलें.

केशव म्हणाला, "गजू ! पाहा ! मान डोलवून 'रागवेल' म्हणून तुझ्या आईने सांगितले."

गजू धावत धावत आईजवळ गेला आणि विचारले, "आई ! रागावशील तूं ?"

"किती लाडावतोस रे गजू! नाही म्हटलं ना !" ती म्हणाली.

ओसरीवर बसता बसतां केशव म्हणाला, "तुझ्या हट्टा खातर तुझ्या आईने 'हो' म्हटलं ! खरं म्हणजे ती रागावलेलीच आहे."

यमुनेची ज्वारी निवडून झाली होती. ती घरात गेली. थोड्या वेळाने विहीरीवर पाणी आणण्यासाठी ती गेल्याचे केशवला दिसलें.

केशव पण उठून गेला.



## : २२ :

केशवला दुसऱ्या दिवसाचं निमंत्रण गजूकडून मिळालं होतं. त्याला जर आमंत्रण नसतं तर तो बहुतेक आलाही नसता. तरी पण तो आलाच ! आज यमुना अन् गजू दोघेही घरीं होते. त्याला बर वाटलं !

तो म्हणाला, "का गजू ! आज पाहूं कोण हरतं !"

"काल तुम्ही हरलात ! आज डाव पदवून घ्यावा लागेल !" गजू म्हणाला.

"बेट लावायला आज माझ्याजवळ पैसे नाहीत. आज दुसरी अट हं !"

"कोणती ?" गजूने आतुरतेने विचारले.

"जर तूं हारलास तर तुला आमच्या घरीं न्यायचं !"

"ऊं ! हूं ! मी नाही यायचा आईवाचून !"

"अन् मी हरलों तर तुमच्याकडे राहीन. मी काम वगैरे काही करीत नाही. मला फुकट जेवण दिलं पाहिजे !" केशव म्हणाला.

गजू म्हणाला, "हें छान आहे ! तुम्ही आमच्याकडे राहिलात की रात्रभर तुम्हाला गोष्ट सागायला लावीन मी ! तुम्हाला निजूं देणार नाही !"

"आपल्या आईला विचार आधी ! ती मला मारून हाकलून तर देणार नाही ना !"

"आई म्हणते अशी बेट लावणे म्हणजे 'जुगार खेळणें' होय ! पाडव जुगार खेळले म्हणून त्यांना वनवासांत जावं लागलं ! हो ना ग आई ?" गजू म्हणाला.

आईने कांहीच उत्तर दिलें नाही. खाली मान घालून ती ज्वारी निवडत होती. केशव म्हणाला, "पाहा तुझी आई म्हणत आहे की, जुगार नाही म्हणून !"

गजू म्हणाला, "सोडा ही गोष्ट काका ! काल कोण जिंकलं हे आईलाच विचारा ! आई, साग ना कोण जिंकलं ?"

यमुना म्हणाली, "मला नाही माहीत."

केशव म्हणाला, "ठाऊक कस नाही ? सारं काही ठाऊक आहे ! निकाल द्यावा लागेल. तुमचं काही और आहे. नाही म्हणजे नाही. मग काहीही हो ! का गजू, ठीक बोलतों आहे ना !"

गजू म्हणाला, "हो, हो ! पण आई कधी खोटं बोलत नाही रामूसारखी."

यमुना म्हणाली, "गजूच्या मनातून रामू काही जात नाही. पुन्हा भाडण न होवो म्हणजे झालं !"

"नाही हो काका ! आता नाही भाडत रामू माझ्याशीं !" गज साळसूदपणे म्हणाला.

विषय बदलून केशवने विचारले, "आज त्या किसनलाल शेठाच्या विहीरीकडे जाताना तुला पाहिलं. खेळायला चालला होता वाटतं ?"

"अं हं ! मुलं म्हणालीं, तेथे वाघीण आली आहे," तो उत्तरला.

"असेल. पण तुझी तेथे जायची काय गरज होती ?" यमुना गरजली.

"अग, वाघीण नव्हतीच मुळी ! ती चंपा धोबीण आहे ना ! तिलाच सारीं मुलं वाघीण म्हणून चिडवीत होते."

"कां बुवा ?" केशवने विचारलें.

"मुलं म्हणतात, तिचा नवरा कलकत्त्याला जाऊन जादू शिकून आलाय ! त्याने कलकत्त्याहून एक बाई आणली आहे बरोबर ! अन् तो चंपाला हाकलून देऊं लागला आहे. चंपा त्या बाईशीं भाडूं लागली. तेव्हा त्याने मंत्राने चंपाला चिमणी बनवायचें ठरविले. पण त्याचा मंत्र

चुकला. ती चिमणी ऐवजी वाघीण झाली. ती गावभर भटकत असते अन् ओरडते सर्वांच्या अंगावर! त्यामुळे तिचा नवरा गेला आहे घाबरून! जो पर्यंत तो तिच्या डोक्यावर हात ठेवत नाही तो पर्यंत ती वाघीणच राहणार! आणि ती वाघीण त्याला कांही हात ठेवूं देत नाही."

"काय फालतू गोष्टी करतो आहेस तूं गजू!" यमुना चिडून म्हणाली.

"अग आई मी नाही सांगत! मुलं सांगतात. तो धोबीच फार वाईट आहे."

या संबंधी केशव आणि गजू यांच्या बऱ्याच गोष्टी झाल्या. यमुना सारं ऐकत होती. ती एकदम संतापून म्हणाली, "चूप बैस पाहू गजू आता!"

गजू ओशाळला. आपण काय केलं हें त्याला कळलंच नाही.

केशव म्हणाला, "तुमच्या अशा वेळी अवेळीं कारण नसताना खेकसण्यानेच तर तो पळाला होता एकदा!"

यमुना वैतागाने म्हणाली, "पळाला तर पळाला; जोवर आपल्याजवळ आहे तोवर आपला; पुढं त्याचं नशीब अन् तो. प्रत्येक वेळीं त्याची अशी बाजू घेऊन त्याला लाडावून ठेऊं नका!" ती रागावली; संतापली. तिला वाटलं केशवच आपल्या गजूला काही काही गोष्टी शिकवीत आहे. त्यामुळे गजू बिघडण्याचा संभव आहे. म्हणून ती विनवणीच्या स्वराने म्हणाली, "मी तुमच्या पाया पडते; अशा गोष्टी सांगून तुम्ही गजूला बिघडवूं नका!"

"यमुनाबाई, मी नाही शिकवलं त्याला! माझं काय चुकलं यात? हजारों गोष्टी मुलांच्या कानावर पडतात. घरात कोंडून तर ठेवता येत नाही ना त्यांना! बाहेर, दहा जणांच्या दहा गोष्टी ऐकतात तीं."

"कोंडूनच ठेवलं पाहिजे असं नाही. त्याना वेळींच दाबलं म्हणजे झालं." यमुना टसक्यांत म्हणाली; "न जाणो कोणाचं काही वाईट झाल तर!"

"तुमचं सारं काही उलटच आहे. कोणाच्या सांगण्याने किंवा बोलण्याने कोणाचं कधी वाईट होतं कां यमुनाबाई ? असं व्हायला लागलं तर जगात प्लेग, कॉलरा, देवी इत्यादि भयंकर रोगांची आवश्यकताच राहिली नसती. यमराजाला काहीच करावं लागलं नसतं आणि......"

"मी तुमच्याशीं वाद घालूं इच्छित नाही. तुमचे अनंत उपकार आहेत माझ्यावर ! मी कधीही विसरणार नाही ते ! मी तुमच्या स्वाधीन आहे. माझं तुम्हाला जें कांही करायचं असेल तें खुशाल करा ! माझी तुम्हाला एकच विनंती आहे ! कुणाचं वाईट चिंतूं नका ! दुसऱ्याने तुमचे काय नुकसान केलं आहे ?"

इतकं बोलून ती तेथून उठून गेली.



## : २३ :

रामूने सर्वांसमोर कबूल केलं की गजू जो मेळा पाहून आला होता तसा त्याने पाहिलेला नव्हता ! तसेंच गजूने मेळ्यांतील पाहिलेली गंमत, गर्दी इत्यादि गोष्टी सुद्धा आपणास पाहावयास मिळाल्या नसल्याचें रामूने सर्वांना सांगितले. या त्याच्या खरेपणाबद्दल गजूला रामूबद्दल आपलेपणा वाटूं लागला होता. तो आपलं स्वतःचं रंगीत कॅलेंडरही त्याला द्यायला तयार झाला होता. पण रामू म्हणाला होता, 'सध्या राहूं दे; पुढे पाहीन !'

आज रामू गजूच्या घरीं आला होता. तेव्हा घरात कोणीही नव्हतं. तो तसाच परतणार तोंच त्याला पोस्टमन येताना दिसला. त्यानं विचारलं, "यमुनाकाकूचं पत्र आहे ? त्या बाहेर गेल्या आहेत ! द्या माझ्याजवळ. मी देईन त्यांना पत्र !"

"पहा हं. हरवूं नकोस. त्या आल्या की त्यांना दे," असें म्हणत पोस्टमनने एक पाकीट त्याच्या हातांत दिलं.

पाकीटावरील पत्ता वाकड्या तिकड्या अक्षरांतच होता. पण पाठविणाराचें नांव 'विनायक' पाहतांच त्याला आश्चर्याचा धक्का बसला. तो मनांतल्या मनांत म्हणाला, अरे ! हें पत्र तर गजूच्या वडिलांचे आहे.

पत्र घेऊन तो निवांत जागीं गेला. ते त्याने अलगत उघडून पूर्ण वाचलं. दूर कुठल्यातरी दवाखान्यांतून विनायकने तें पत्र यमुनेला लिहिलें होतें.

"खूप वर्षानंतर मी तुला पत्र लिहीत आहे. त्याबद्दल मला क्षमा कर. माझं मन शांत नव्हतं. आज मोठी हिंमत करून मी तुला लिहीत आहे. हें पत्र तुला मिळेल किंवा नाही हें मात्र निश्चित कांहीच सांगता येणार नाही. तूं कुठे आहेस, गजू कसा आहे, तुमच्या तब्यती कशा आहेत हें मला ठाऊक नाही. आज राहवेना आणि म्हणून हें पत्र लिहायला बसलों आहे मी !

"पंढरपूरच्या यात्रेनंतर मी अचानक आजारी पडलों. वाटलं, आपण आता जगत नाही. परन्तु परमेश्वरी कृपेने मी आता हिंडूंफिरूं लागलों आहे. पत्र पाहतांच तूं जर दहा रुपये पाठवूं शकलीस तर अवश्य पाठव. तुम्हां सर्वांना पाहण्याची फार इच्छा आहे. बाकी समक्ष भेटल्यावर सांगेन. तूं मला क्षमा करशील अशी आशा आहे."

खाली दवाखान्याचा पत्ता वगैरे दिला होता.

रामूच्या सैतानी मनात निरनिराळे विषारी विचार नाचूं लागले. गजू नसतांनाच काकीला पत्र द्यावं. त्या उत्सुकतेने अधीर होऊन मलाच पत्र वाचायला देतील. मी कांहीतरी, स्वतःचं लावून पत्र वाचीन. सांगेन---नोटीस आहे. तुम्ही कुणाचे एक हजार रुपये उसने घेतले होते त्याची. अं हं, असं नाही. सांगेन की तुमच्या माहेरचं पत्र आहे. ते सर्वांत धाकटे मामा आले होते ना ! ते गेल्याची बातमी आहे. त्याना रडवून सोडेन मी अगदी. आणि मधेच जर गजू आला तर मी पत्र घेऊन पळून जाईन. त्याला पाहू देणार नाही. अन् केशव-काका आले तर---केशवची आठवण होतांच त्याच्या चेहऱ्याचे भाव पालटले. त्याला केशवच्या वागण्याचा राग येई. किती दुष्ट आहे तो ! आणि गजू आणि गजूची आई ते सांगतील तसे वागतात.

त्याला एकदम आठवलं; गजूने आपल्या आईच्या नावाने पत्र लिहूनच कॅलेंडर मागवलं होतं. त्याचप्रमाणे पत्राचं उत्तर पण परस्पर लिहिलं तर......

घरीं जाऊन त्याने वहींतला एक कागद फाडला आणि त्यावर तो पत्र लिहूं लागला.

"गजूला मरून पुष्कळ दिवस झाले. तुम्ही सुद्धा माझ्यासाठी मेलेलेच आहात. मी केशवशी लग्न लावले आहे. तुम्ही येथे येण्याची काही गरज नाही. भीक मागूनही पुष्कळ पैसे मिळवता येतात. मी आनंदात आहे."

पाकीट बंद करून तो लाल पेटींत टाकून आला. घरीं आल्यावर एक बैलगाडी बाहेर जाण्यासाठी तयार होती. वडिलाबरोबरच त्याला बाहेर जावे लागले.

विनायकाचे पत्र त्याच्या खिशात होतं. ते अचानकपणे त्याच्या वडिलाच्या नजरेस पडले.



: २४ :

किती तरी दिवसांपासून यमुनेच्या मनांत केशवला दिलेल्या वचनासंबंधीचे विचार येत होते. आज संधी पाहून ती केशवला म्हणाली, "मला तुमच्याशीं कांही बोलायचं आहे."

केशव म्हणाला, "माझी पण तशीच इच्छा आहे. मोतीराम पाटील आता काही तरी करील ! तुम्ही तुमचे नक्की करा ! मी सांगतों ते ऐका !"

आपण केशवशीं कसं बोलावं याबद्दल यमुना कांहीच निश्चय करूं शकली नाही. तिच्या मनांत द्वंद्व होतं. कसं सांगावं याचाच ती विचार करत होती.

केशव जायला निघाला तेव्हा यमुना म्हणाली, "बसा ! मला तुमच्याशीं कांही बोलायचं आहे."

तिच्या ओठाबाहेर आलेले शब्द ओठांतच घुटमळूं लागले.

जाण्याच्या घाईत केशव म्हणाला, "आता मी जरा घाईत आहे. पुन्हा येईन. मी स्वतःच मोतीराम पाटलाला भेटून ठरवून टाकलें सारं कांही." असें बोलून तो जाऊं लागला.

यमुना वाट अडवून म्हणाली, "थांबा ! मला दुसरंच कांही बोलायचं आहे."

या गडबडींत केशवच्या अंगाला तिच्या पदराचा स्पर्श झाला. त्याच्या रोमरोमात एक गोड शिरशिरी भरली. तो क्षणभर स्वतःला विसरला अन् आपलीं कामें पण !

तो एकदम भानावर येऊन म्हणाला, "बोला, काय बोलायचं आहे?"

"बसायला वेळ नाही वाटतं?" यमुना म्हणाली.

"हा घ्या बसलों. रागावूं नका!" खाली बसत बसत केशव म्हणाला.

"टाळाटाळी नाही करायची!"

"नाही!"

"नक्की नाही?"

"याचा मी विचारच केला नाही. पण गोष्ट जर माझ्या आटोक्या-बाहेरची असली तर?"

"अस होणार नाही! माझ्यावर विश्वास ठेवा!"

"मग वचन देतों मी. तुम्ही जें म्हणाल त्याला मी माघार घेणार नाही. पण आज कांही सांगूं नका!"

"घाबरूं नका! मी तुम्हाला संकटांत नाही टाकणार!"

"तरीपण आज नको! आज कस तरीच होतं आहे मला! माझा स्वतःवर सुद्धा आज विश्वास नाही." केशव म्हणाला.

इतक्यात बाहेरून गजूची हाक ऐकूं आली.

"आई!"

केशव म्हणाला, "गजू शाळेतून आला वाटतं! त्याचाच विचार मी करीत होतों. तो मुलगा आहे. पण आजकालचीं मुलं नुसतींच मुलं नसतात! त्याना इतर पुष्कळ गोष्टी समजतात. त्याना फार फार कळतं!"

यमुना गंभीर झाली.



थोड्या वेळाने गजू घरात आला अन् त्याने विचारलें, "आई, केशवकाका आले होते?"

"हो!"

"कशाकरिता आले होते ?" गजूने विचारलें. पण उत्तराची वाट न पाहतां तो कांहीतरी शोधूं लागला. एके ठिकाणीं त्याला कापडी चेंडू दिसला तो घेऊन त्याने पळ काढला.

यमुनेच्या मनात आलं की गजूचे केशवकाकावरील प्रेम कमी झालं असावं !

रात्रीं जेवायला बसल्यावर गजू म्हणाला, "आई, कुणाचं पत्र आलं आहे ?"

"मला कोणाचं पत्र येणार गजू !"

"मला आपलं वाटलं तस. तूं उदास दिसतं आहेस ना !"

"पत्र आलं तरी मला कुठं वाचतां येतं आहे ? तुलाच दिलं असतं वाचायला !"

"नाही ! म्हटलं मी नसताना रामूबिमूकडून तर नाही घेतलं वाचून ? खरंच साग ना आई, कांही पत्र आलं का ?"

गजूची काकुळती पाहून यमुनेला शंका आली. ती म्हणाली, "नाही रे गजू ! कोणाचेच पत्र आलं नाही. आणि आलं असतं तर मी ते तुझ्या-पासून थोडंच लपवलं असतं !"

"काही वाईट पत्र असेल म्हणून तूं लपवून ठेवीत नाहीस ना माझ्यापासून ? मी रडणार नाही !" असें म्हणून तो रडण्याच्या बेतांत आला.

"मी कांही पत्र लपवलं नाही रे ! वाईट गोष्ट कोणती ?"

"तीच ! बाबांच्याबद्दल !"

"अरे, मला पत्र आलें आहे हें तुला सागितलं कुणी ?"

गजू निश्चिंत झाला. त्याची खात्री झाली की पत्र आलंच नाही. त्याने एक प्रदीर्घ सुस्कारा सोडला. तो म्हणाला, "सारं खोटं ! त्या काकांनी मला उगाच घाबरवलं ! तरीच मला वाटलं की, आई मला कस कांही सागणार नाही ?"

यमुना कांहीच बोलली नाही. गजूचं पान वाढून ती तेथेच बसली.

दुसरे दिवशीं मैदानावर त्याला रामू दिसला पण त्याने गजूकडे पाहिलं सुद्धा नाही.

गजू पुढे जाऊन त्याला म्हणाला, "रामू केव्हा आलास गावाहून ?"

"काल आलो" असे म्हणून रामू पुढे गेला. गजू आपल्याबरोबर येत आहे हे पाहून रामू त्याला म्हणाला, "माझे काका रागावतात !"

"कशासाठी ?—खेळण्यासाठी ? चल तर मग माझ्या घरीं ! आपण दोघे मिळून अभ्यास करूं ! मी भूगोल करीन, तूं गणित कर !"

"मोठ्या भूगोलाच्या पुस्तकात मला एक गाव पाह्यचं आहे ! तेथं एक दवाखाना आहे !"

"दवाखाने नाही दाखवत नकाशात ! रेलवेचे फाटे मात्र दाखवितात. दवाखाने पण दाखवावयास हवे."

राघे मधेच म्हणाला, "अन् ते पत्र ?"

रामूने सफाईदार उत्तर दिले, "कोणतं पत्र ? मला काय ठाऊक ? माझ्या काकाना आलं असेल ? घरच्या गोष्टी दुसऱ्याना सांगायच्या नसतात."

राघे म्हणाला, "मला तुमच्या घरच्या गोष्टीची काय पंचाईत ? मी तर नुसतं पत्राबद्दल विचारीत होतों."

रामू रागावून म्हणाला, "ऐकलंस गजू ! किती खोटाड्या आहे हा ? म्हणून तर माझ्या बाबाना असल्या मुलांची संगत आवडत नाही."

राघे म्हणाला, "तूं मोठ्या सावकाराचा मुलगा आहेस ! चलरे गजू, आपण वेगळेच खेळूं !"

गजूला राघेचें वागणे आवडले नाही. त्याला वाटलं की राघे पत्रासाठी उगीच जळतो आहे.

आपल्याला काहीच ठाऊक नाही असे दर्शवीत रामू म्हणाला, "कोणाचं पत्र ?"

"तो म्हणत होता की आईला कोणाचं तरी पत्र आलं आहे! तिने तें मला न दाखवितां तुझ्याकडून वाचून घेतलं म्हणे! तूं तर गावाला गेला होतास ना? एकदम कसा आलास? सारं खोटं, साफ खोटं!"

टाळ्या वाजवीत रामू म्हणाला, "खोटं नाही! खरं आहे! जादूने दुसऱ्यांचीं पत्रे माझ्या हातांत येऊं शकतात. जादूच्या जोरावर मी वाटेल ते करूं शकतों."

सर्व मुले खदखदून हंसलीं.

राघे ओशाळला. तो म्हणाला, "मी तस ऐकलं म्हणून म्हटलं! खोटं असेल कदाचित्!"

गजू म्हणाला, "राघे, खोटं नव्हे रे तें! तें अस अं शकेल! मी गावाला गेलो होतों ना? तेव्हा तेथून एक पत्र पाठविलं होतं! मी परतल्यावर दुसरे दिवशी ते पत्र घरी मिळालं. तेंच पत्र घेऊन रामू आईजवळ सांगायला गेला होता की, गजूचे पत्र आलं आहे. तो लवकर येणार आहे! तूं काहीही काळजी करूं नकोस! उगाचच आपण गैरसमज करून भांडतों आहोंत!"

साऱ्यानाच हा युक्तिवाद पटला आणि ते सर्व क्रीडांगणाकडे धावले.



: २५ :

राघे आला अन् गजूला म्हणाला, "तूं मला खोटा म्हणत होतास ना? पण मी म्हणत होतो तेंच खरें आहे."

तो म्हणाला, "कशाबद्दल तूं म्हणत आहेस? पत्राबद्दल का? आईला आलं आहे पत्र?"

"हो, आलं आहे पत्र!" राघे म्हणाला.

गजूची आईबद्दलची शंका बळावली. तो राघेला म्हणाला, "तुला कळलं कस हें? केशवकाकाना ठाऊक असेल कदाचित्!"

"त्याना ठाऊक आहे; पण ते तुला सांगणार नाहीत." राघे म्हणाला.

गजू उद्विग्न झाला. तो त्याच दिशेने विचार करूं लागला. आताच थोड्या वेळापूर्वी वाटेत एका व्यक्तीने विचारलं होतं; "तुझ्या वडिलाची काही बातमी वगैरे समजली आहे काय?" त्यावेळीं त्याने तिकडे दुर्लक्ष केले होतं. पण आता तो विचार करूं लागला. पत्र जरूर आलं असलं पाहिजे! जिकडे तिकडे बातमी पसरत आहे. खोटी कशी असेल?

राघे म्हणाला, "रामूला सुद्धा माहीत आहे!"

पत्र आल्याचं सर्वांना ठाऊक आहे. त्या व्यक्तीला माहीत आहे, केशवकाकाना माहीत आहे; रामूला माहीत आहे! फक्त माहीत नाही कोणाला तर गजूला! ही अत्यंत लज्जास्पद गोष्ट आहे. त्याने मान डोलावित म्हटलं, "रामू बदमाष आहे! तो कांहीही बकतो."

राधे त्या गोष्टीचं समर्थन करीत म्हणाला, "हो ना! तो काहीही बोलतो. तो म्हणत होता, गजूचं शेत, त्याचं आंब्याचं झाड, घर, सारं कांही लिलाव करून मी त्याला गावांतून हाकलून देईन. त्याच्याकडून आम्हांला खूप घेणं आहे. त्याच्या वडिलाचे पत्र आलं आहे की ते मेले म्हणून. आता आमचे काका कोणाचेही ऐकणार नाही. आम्ही सर्वांनी विचारलं की ते मेले आहेत ना? मग त्यांचं पत्र कसं आलं? मग मात्र तो उठून पळाला. न जाता तर आम्ही चागलंच पिटून काढलं असतं त्याला. आणि सागतों काय की, माझ्या काकांनी वाईट मुलाशीं संगत धरूं नका म्हणून सागितलं."

गजू म्हणाला, "केशवकाकाना विचारूं?"

राधे म्हणाला, "मूर्ख आहेस तूं! यात काय विचारायचं? सारेच म्हणतात तुझे बाबा वारले म्हणून!"

गजू सतापला, "वा? वारले कसे? तूं चालता हो आपल्या घरी! उगाच भलतं सलतं नको बोलूस!"

राधेने सूर बदलला, "अरे, सर्वांचेच वडील मरतात! त्यांत एवढं रागवावयाला काय झालं? पण गजू, त्या केशवकाकाना तुमच्या घरचा उंबरटा चढूं देऊ नकोस! ते फार वाईट आहेत."

"कां?"

"त्यांनी तुझ्या आईवर जादू केली आहे. हे काम त्याच्याशिवाय कोण करूं शकणार?"

"माझ्या आईवर कोणी जादू करूं शकत नाही. माझी आई छान वागते. माझ्याकडे भुतं वगैरे कांही येत नाहीत," गजू ताठ्यात म्हणाला.

राधे हळूच त्याच्या कानात पुटपुटला, "एक गोष्ट सागूं? रागावणार नाहीस?"

"साग!"

"तुझी आई एक वाईट गोष्ट करणार आहे. फार वाईट गोष्ट! याच केशवकाकांशीं......"

वाक्य पूर्ण होण्याच्या अगोदरच गजूने त्याला दाराबाहेर ढकललं.

राधे ओरडला, "बघा काकी ? गजू मला मारतो."

यमुना आतून ओरडली, "कां भांडतां रे ! थांब मी आलेंच."

राधे पळाला. त्याला वाटलं कुठं आपल्या समोरच तो खरं खोटं करायचा.

गजू क्षणभर विचारात मग्न झाला. बाबा खरंच वारले का ? आपल्याला वाईट वाटूं नये म्हणून आई रडत नसेल ! मी गावांहून परत आल्यानंतर तर ती मला आनंदीच दिसली.

"नाही ! बाबा जिवंत आहेत !" त्याने हे वाक्य इतक्या मोठ्याने उच्चारले की, जणूं काही तो प्रतिपक्षाच्या आरोपाचे खंडनच करीत आहे. ते वारले असते तर आपल्याला कसेतरीच झाले असते. आणि आईला सुद्धा अत्यंत वाईट वाटलं असतं."

त्याला एक प्रसंग आठवला. खेळता खेळता त्याला एक खोंक पडली होती. त्यावेळीं त्याची आई अत्यंत अस्वस्थ झाली होती. आईचं मन किती कोमल आहे ! राधे काहीतरीच सांगतो.

गजू उठून बाहेर गेला. बाहेरच्या गार वाऱ्याने त्याची उदासीनता पळून गेली. तो मनाशींच पुटपुटला. "मी स्वतःच रामूला स्पष्ट विचारीन ! तो सारं खरं सांगेल मला !" इतक्यात त्याला राधे येताना दिसला.

राधे आणि गजू चालूं लागले.

वाटेत त्याना एक कागदाची पुडी दिसली. ती उचलायला दोघेही धावले.

राधे म्हणाला, "तंबाखूची पुडी दिसते आहे !"

गजू म्हणाला, "शेंगा असतील !"

राधेने गजूच्या हातातून पुडी हिसकली. त्याने ती उघडली. तो ओशाळला. गजू हसूं लागला.

पुडींत माती आणि दगड होते.

समोरून चार पांच मुलें येत होतीं. रामूही त्यांत होताच ! तीं मुलें

त्याच्यासमोर येऊन उभी राहिलीं. रामू म्हणाला, "माझी शेंगाची पुडी येथेच कुठेतरी पडली आहे. सांगा कोणी घेतली ती? मी पैसे वसूल करीन."

इतर मुले जोरजोराने हसूं लागलीं. एक म्हणाला, "शेंगा नाही! तंबाखू होती. गजू विड्या ओढतो ना! मी मास्तराना सांगेन!"

गजूने रामूला पत्राबद्दल सरळ सरळ विचारायाचे ठरविले होते. पण त्याची ही विचित्र वागणूक पाहून तो म्हणाला, "रामू! तूं फार हलकट आहेस."

"हलकट? तूं का मी? दुसऱ्याच्या वस्तू चोरतोस? आणि मला हलकट म्हणतोस? थांब, तुला मी पोलीस नाक्यात बंद करतों." रामू संतापाने म्हणाला.

"आला मोठा पोलीस नाक्यात बंद करणारा! ताकद तर पाहा!" असे म्हणून गजू पुढे गेला. रामूही गजूच्या मागोमाग चालूं लागला. गजू म्हणाला, "तूं माझ्या मागे कां येतोस?"

"माझी खुशी! तूं कोणाला अडवूं शकत नाहीस!"

"मग जा तूं!" असें म्हणून गजू उभा राहिला.

"नाही जाणार मी! तूं कोण मला हुकूम करणारा?"

गजू चालूं लागल्यावर रामू पण त्याच्या बरोबर चालूं लागला. तो म्हणाला, "चल घरीं! काकीकडून पिटवतो तुला आज"

गजू राधेकडे वळला अन् म्हणाला, "चल राधे, आपण विहिरीवर स्नान करायला जाऊं! त्या ठिकाणीं रात्री मोठीं भूतं असतात म्हणे! पाहतों आता कोण येतं माझ्या बरोबर! ते पहा अंधारात एक भूत उभं आहे!"

इतर मुले घाबरलीं अन् पळालीं. रामू म्हणाला, "मी हलकट मुलांच्या बरोबर जात नसतों" आणि तोही घराकडे जावयास निघाला.

---

## : २६ :

"गजू, जरा आपल्या काकांना तर बोलावून आण !" यमुना म्हणाली.

गजू समजला की आई केशवकाकाना बोलावून आण म्हणून सागते आहे. पण त्याने मुद्दामच विचारले !

"मोहन काकाना......?"

"त्यांना नाही रे ! तुझे काका !"

"कोण ? केशवकाकाना बोलवायचं का ? मला आता गणितं करायचीं आहेत ! अभ्यास केला नाही तर मास्तर मला मारतील ! थोड्या वेळानंतर जाईन"

"एक तास झाला नुसता हुंदडतो आहेस ! म्हणे अभ्यास करायचा आहे ! जा आधी ! जातोस की नाही !"

गजूने आईकडे पाहिले. तिचा काळजीने काळवंडलेला चेहरा पाहून तो खिन्न झाला. एकदम असबद्ध प्रश्न त्याने विचारला. "आई तूच म्हणालीस की, बाबाचं पत्र आलं नाही म्हणून !"

यमुना म्हणाली, "माझ्याजवळ पत्र आलं नाही. आलं असतं तर तुला दाखवलं नसतं का ? आणखी कोणाला तरी पत्र आल्याची बातमी आहे !"

"रामूला आलं आहे पत्र ? अगदी खोटं !" गजू एकदम म्हणाला, "बाबाचं पत्र रामूला येण्याचं काय कारण ? पत्र आलं असतं तर मला येतं. आलं असेल तर केशवकाकांना आले असेल ! मी त्यांना विचारलं होतं एकदा ! तेव्हा त्यांनी कांही नीट उत्तर दिलं नव्हतं !"

"रामू तुला शाळेत भेटत असेल !"

"कित्येक दिवस झाले तो शाळेत येत नाही. एकदा मास्तरानी त्याला खूप मारलें होते. शाळेत नेहमी तो गप्पाच मारतो !"

यमुना म्हणाली, "तो जर माझ्याजवळ आला तर मी त्याला विचारीन."

"तो आपल्या बापाला ऐकत नाही, तुझं काय ऐकेल तो ? मुलं म्हणतात की त्याला एक पत्र आलं आहे नि त्याचं उत्तरही त्याने पाठविलं ! मला अस वाटतं की, केशवकाकानाच पत्र आलं असेल ! राधेही असच म्हणत होता !" गजू म्हणाला.

यमुना म्हणाली, "त्याना नाही पत्र आलं ! जा बरं, त्याना बोलावून आण."

केशवकाकाबद्दल आईच्या मनात असलेला विश्वास गजूला आवडला नाही. तो म्हणाला, "आई, तुझा फार विश्वास आहे केशवकाकावर ! राधे म्हणाला की, रामूच्या वडलानी त्याना कसली तरी नोटीस दिली आहे. म्हणूनच ते लपवीत असतील ! केव्हाना केव्हा खरी गोष्ट कळेलच."

यमुना रागावली आणि कठोर स्वरात म्हणाली, "तुला नाही ठाऊक ! जा तूं !"

गजू निघून घेला.

यमुनेने आपल्या पतीच्या आजाराची बातमी कोठून तरी ऐकली होती. आजारपणाच्या बातमीने सुद्धा एक क्षणभर तिच्या अंगांत आनंद सचारला होता. आजारी आहेत; म्हणजे जिवंत आहेत नक्कीच ! तिच्या मनांत असख्य विचार येऊं लागले. 'ते कसे असतील ? त्याना कसला त्रास होत असेल ! आजारपणात पाणी द्यायलासुद्धा कोणी नाही त्याच्याजवळ ! त्यांना औषध कोण देत असेल ? या सर्वांचा पत्ता कसा लागेल ?'

यमुनेने कितीतरी दिवसापासून तिच्या पतीची बातमी ऐकण्यास कान उत्सुक केले होते. कधीपासून दोन्ही डोळे लावून ती त्यांची मार्ग-

प्रतीक्षा करीत होती ! दिवस उगवला नि मावळला ! रात्र आली अन् गेली ! सप्ताह, पंधरवाडे, महिने आले नि गेले. वर्षें सुद्धा गेलीं. असं असून सुद्धा तिने निद्रेत अगर जागेपणात, सुखात अगर दुःखात आपल्या एकमेव आशेचा कधीहि त्याग केला नाही. तिच्या अंतःकरणात फक्त एकच आशा-दीप सतत तेवत होता. आज पुन्हा तिला वाटलं, 'दीप विझला नाही; तो कधीना कधी प्रदीप्त होईल. आज आपल्या नवऱ्याची बातमी मिळाली आहे. आपण नवऱ्याला पाहू शकूं इतक्या जवळ तो आहे ! पण बातम्या डोळ्यानी पाह्यच्या नसतात ! कानानी ऐकावयाच्याच असतात ! पण माझे कान तर बधिर झाले नाहीत ना ? देवा ! हें सारं काय चाललं आहे ? का माझा अंत पाहतोस ?"

पण हे असं झालंच का ? आपले ग्रह चागले झाले म्हणजे आपला पति आपोआप घरी येईल या गोष्टीवर तिचा विश्वास होता. ते तिच्याकडे येतील अन् झोपेतून उठवीत म्हणतील, "कसं काय, ठीक आहेना !" पण मी इतकी हतभागिनी आहे काय ? आज हें काय ऐकते मी ! माझ्यापेक्षा जास्त जवळचे या गावात कोणी त्याना आहे काय ? ते आपली दुःखे दुसऱ्याजवळ सागूं शकतील कां ह्या गावांत ! मी किती दुर्दैवी ! देवा ! हे काय ?

तिच्या डोळ्यातून अश्रूचे ओघळ वाहूं लागले !

किती वेळ झाला, त्याचे तिला भान नव्हतें. गजू येताच ती चपापली. "केशवकाका कांही महत्त्वाच्या कामानिमित्त बाहेर गेले आहेत. थोड्या वेळाने येतील" गजू म्हणाला.

यमुनेने केशवला मुद्दामच बोलावलं होतं. तिला विचारायचं होतं की, ह्यांच्या आजारीपणाची बातमी पसरली तरी कशी ? मोतीराम पाटलाकडे काही पत्र आले आहे काय ? कदाचित् जयरामकडे पण बातमी आली असावी. कसेंही करून त्याचा तपास तर करावयास हवाच ! तिचे हात पाय लटलटूं लागले.

'काय करावं' या बाबत ती कांहीच निश्चय करूं शकली नाही.

---

# : २७ :

केशव पोस्ट ऑफीसकडे चालला होता. वाटेतच त्याला पोस्टमन भेटला. त्याला थांबवून तो म्हणाला, "जरा थांबता का ! तुम्हांला कांही विचारायचं आहे ?"

पोस्टमन थांबला. केशवने त्याला विचारलें, "यमुनाबाईचे कांही पत्र आलं होतं कां इतक्यात ?"

"आलं असेल ! बरं आहे !"

"असेल काय ? ते पत्र तुम्ही त्याना न देता चुकून दुसऱ्याला दिलेलं दिसतं !"

"दुसऱ्याच्या पत्राबद्दल मी तुम्हाला कस सागूं ?" इमानदारीचा आव आणीत तो म्हणाला. "आमच्याकडे असा नियम नाही. पोस्टल गाईडमधे लिहिलं आहे......"

"त्यांत कांहीहि लिहिलं असेल पण तुम्ही एखाद्याचं पत्र दुसऱ्याला देऊं शकत नाही. यमुनाबाईना हें समजलं आहे. याची तक्रार करण्या-साठी त्या कलेक्टर साहेबांच्या बंगल्यावर जावयास निघाल्या होत्या. मीच त्यांना रोखलं नि म्हटलं, तीं आपलीचं माणसे आहेत. कोणाच्या पोटावर पाय देणें बरं नाही. 'हें पहा ! दुसऱ्या कोणालां त्यांचें पत्र चुकून दिलं असल्यास तुम्ही मला परत आणून द्या. उगीच कोणाला तक्रार करायला संधी नको !" केशव दटावणीच्या स्वरात म्हणाला.

पोस्टमनने उत्तर दिलें, "त्यांना जर तक्रारच करायची असेल तर खुशाल करूं दे ! अगदी मिनिस्टरपर्यंत पोंचल्या तरी हरकत नाही.

मला त्याची भीति नका दाखवूं ! पण काहो ! त्याचे पत्र मी तुम्हाला कस देणार ? नियमाच्या विरुद्ध आहे हें !"

"पण यमुनाबाईचं पत्र मोतीराम पाटलाच्या मुलाला देणे सुद्धा तर नियमाच्या विरुद्ध आहे !" केशवने जरा रागानेच म्हटले.

पोस्टमन हंसत हंसत म्हणाला, "यमुनेचं पत्र तुमच्या हातांत मी इतक्यात कसं देऊं ? तुम्ही अजून लाडू कुठे दिले आहेत ? माझं तोंड पण गोड केलं नाही. आणि सारा समारंभ कुठं झाला आहे अजून ? जेव्हा लाडू खाऊं अन् ढेकर देऊं तेव्हा तुम्ही खरे मालक बनाल !"

केशवला पोस्टमनची हो चेष्टा आवडली नाही. तो म्हणाला, 'उगाच कांहीतरी बोलूं नका ! ठीक आहे ! पाहून घेईन मी !"

"अहो ! रागावलात वाटतं !" पोस्टमन म्हणाला, "मी तुम्हाला सारं खरं खरं सागतों. आजकाल माझी ड्यूटी जवळच्या खेड्यात आहे. या गावाचे काम दौलत पोस्टमन करतो. मला आठवतं आहे की, यमुनेचे एक पत्र आले होते. डाक सॉर्ट करताना मी पाहिलं होतं. पंधरा-वीस दिवसांपूर्वीची गोष्ट असावी ही !"

"हो हो, बरोबर आहे ! इतक्याच दिवसापूर्वीची ही गोष्ट असावी." आपले अज्ञान प्रगट न होऊं देता केशव म्हणाला.

पोस्टमन पुढे सागूं लागला, "तें पत्र दौलतने मोतीराम पाटलाच्या मुलाच्या हातात दिलं. तो मुलगा यमुनेच्या मुलाच्या वर्गात शिकतो ना ! दौलतच्या विरुद्ध अशा अनेक तक्रारी आहेत ! तुम्हीं जरूर त्याच्या-विरुद्ध तक्रार करा. मी रात्रीं तुम्हाला सर्व सागेन. आता तर मला वेळ नाही. दहा-पंधरा मैलांचा चक्कर मारून रात्रीं परत यायचं आहे ! मोठी त्रासाची आहे ही नोकरी !"

असें म्हणून तो पोस्टमन निघून गेला.

केशव ताबडतोब मोतीराम पाटलाच्या घरीं गेला. पाटील आपल्या घराच्या नवीन बैठकींत होते. घराचे काम अजून चालूंच होते. एका

मळकट शाईचे डाग पडलेल्या सतरंजीवर मोतीराम पाटील बसले होते. त्याचेजवळ हिशेबाच्या वह्या दिसत होत्या.

केशवला पाहिल्याबरोबर ते वह्या अन् कागद सावरीत म्हणाले, "या ! आज इकडे कुणीकडे !"

नमस्कार केल्यावर केशव म्हणाला, "आलो झालं असच ! रामू भैय्या कुठे आहे आपला ?"

पाटलाचा चेहरा एकदम गोरा मोरा झाला. ते म्हणाले, "आताच बाहेर गेला आहे ! काही काम आहे का त्याच्याशीं ? कांही विचारायचं असेल तर मला विचारा !"

"नाही ! आपलं सहज विचारलें. पाटील साहेब, रामूला तुम्ही शिकण्यासाठी एका मोठ्या शहरांत पाठवा. थोडं थोडं इंग्रजी शिकला की तो लवकर एखादा मोटा ऑफीसर होईल. जरूर पाठवा त्याला शिकायला !"

पाटील जरा खुषीत आले. ते म्हणाले, "माझी सुद्धा हीच इच्छा आहे. पण शहरात वाईट संगतीमुळे मुले बिघडतात ना ?"

"असे कसे होईल ? महिना-पंधरा दिवसांतून तुम्हांला कोर्टाच्या कामासाठी शहरात जावेच लागते ना ? देखरेख राहीलच तुमची !" केशव म्हणाला.

पाटलानी एकदम विषय बदलला. ते म्हणाले, "यमुनेशी पाट लावायचं काय झालं ? त्यांत उशीर कशाबद्दल होत आहे ? अशा गोष्टींत उशीर नको. मधे काड्या घालणारे पुष्कल लोक असतात. यमुनेने जर आणखी कोणाचं ऐकलं तर ! उद्या काय होईल हे कोणी सांगू शकत नाही. उद्या करणार असाल तर आजच करा. आणि हें पहा, तुमचा आमचा झगडा पण मिटवून टाकूं ! उगाच कोर्ट कचेऱ्या कशाला? त्यात दोघाचेही नुकसान होते."

केशव म्हणाला, "एकदा, हिशोब तर करा. तुम्हाला किती पैसे मिळाले, कधी मिलाले वगैरे सर्व नीट पाहून सांगा. तसेंच, व्याजाचा दर

काय, किती व्याज झाले, वगैरे सर्व माहीत तर करून द्या. आणि हें पहा, यमुनेबद्दल तुम्ही जे बोललात ते सर्व खोटं आहे. यमुना कांही अशी नाही की......"

"वाऽवाऽ केशवराव ! असल्या गोष्टी वेशीवर यायला वेळ लागत नाही. बाकी, हात खूप मारला तुम्ही ! फार चागलं झालं ! यात वाईट काहीच नाही. ज्या ठिकाणीं सूर्य पोंचूं शकत नाहीं त्या ठिकाणीं कवि जाऊं शकतों या म्हणीप्रमाणे तुम्ही केलं ! वा, कसं ओळखलं आम्ही ?"

' पाटील हें सारं खोटं आहे. मी सागतो, असं काहीही नाही." केशव म्हणाला,

"खोटं आहे ना ! हात्तेच्या ! मग खरं करून दाखवा ! अन् तेही लवकर ! या कामात काही मदत हवी असल्यास मी देण्यास तयार आहे. बस ! उशीर नको !" मोतीराम पाटील म्हणाले; "पण तुम्हाला माझा झगडा मिटवायला हवा ! बस ! लवकर करा !"

"का ! घाई का ? कारण विनायक जिवंत असल्याची बातमी तुम्हाला मिळाली आहे म्हणून ! का यमुनेचं शेत आणि विहीर तुमच्या ताब्यात देऊं ? कारण विनायक परत आल्यानंतर त्याच्यासाठी काहीहि शिल्लक राहूं नये ! कां, खरं आहे ना ?" केशव खवचटपणे म्हणाला.

क्षणभर मोतीराम विचारात पडला. त्याच्या तोंडून काहीच उत्तर निघालं नाही. कोरडं हास्य करीत तो म्हणाला, "तस नव्हे केशव ! सारेच बेईमान नसतात ! मी आपलं तुझ्या फायद्याचं बोललों. आणि त्या बरोबर माझी झंझट पण सपेल !"

याचवेळीं रामू एकदम आला आणि म्हणाला, "काका, ती वस्तू पेटींत नाहीं सापडली ! आजीने सारं धुंडलं !"

मोतीराम ओशाळला. इतक्यात रामू येथे यावयास नको होता. कारण पांच मिनिटापूर्वीच तो घरात नसल्याची खोटी थाप त्याने दिली होती. तो म्हणाला, "रामू ! बरं तूं आता जा."

केशवला पाहताच रामूला नेहमी संताप येई. पण आज मात्र त्याला आसुरी आनंद झाला. आज कस झकत आमच्या घरीं यावं लागलं! त्याला काही विचारण्यापूर्वी मोतीराम म्हणाला, "त्याला काय विचारतां? जें विचारायचं असेल ते मलाच विचारा!"

रामू मधेच म्हणाला, "विचारूं द्या न काका त्याना. ठीक उत्तर देऊन त्याचे तोडं बंद करीन! त्या पत्राबद्दलच विचारणार ना? विचारा!"

केशवचा चेहरा संतापाने लाल झाला. हा मुलगा इतका उर्मट असेल याची त्याला कल्पना नव्हती. केशव म्हणाला, "चागले दिवे लावेल हा पोरगा! कुळाचं नाव मोठं करशील अशाने हा! पत्राबद्दल विचारायला आलों होतो. तूं पोस्टमनकडून यमुनेचे पत्र घेऊन लपवून ठेवलं आहेस ना?"

उर्मटपणाने रामू उत्तरला. "तुम्ही मला विचारणारे कोण? तुम्ही काही पोलिस-शिपाई नाही? आपल्या घरची वाट धरा. मी तुम्हाला काहीहि सागणार नाही" असे बोलून रामू तेथून निघून गेला.

मोतीरामला रामूचे हे उद्दामपणाचे उत्तर ऐकून खेदाबरोबर आनंदही झाला. तो स्वतः असे बेजबाबदार उत्तर केशवला देऊं शकला नव्हता. त्याच्या चेहऱ्यावर एक प्रकारचे समाधान दिसले. त्याला वाटले रामू शिकून सवरून उतम सरकारी ऑफीसर बनेल आणि घरची स्थावर इस्टेट चागल्याप्रकारे साभाळील.

केशव एकदम उठला. तो म्हणाला, "मुलगा आहे म्हणून सोडून देतों, दुसरा कोणी असता तर चांगलाच इंगा दाखविला असता. बरं आहे! मी पोलीस चौकींत जाऊन रिपोर्ट करतों."

मोतीरामने हात धरून त्याला खाली बसवले; तो म्हणाला, "पोराची जात आहे; कशाला लावून घेतां मनाला? पण ही पत्राची काय भानगड आहे?"

"पत्राची भानगड तुम्हाला कांहीच माहीत नाही का पाटील? कशाला ही लपवाछपवी? मुलाने पत्र हरवले असले तर हरवूं दे! पण त्यातला मजकूर तर सागाल!"

"पोस्टमन म्हणतो की, त्याने यमुनेचे पत्र रामूजवळ दिले म्हणून! तो दुसऱ्याचे पत्र भलत्याच कोणाजवळ कसा देईल? तरी पण मी एकटा शातपणाने त्याला विचारीन! यावेळी तो काहीही सागणार नाही. तो काय म्हणाला ते तर तुम्ही ऐकलेच आहे."

"तुम्ही त्याला काय आणि कसं विचाराल हे मी ओळखलं! बरं आहे पाहून घेईन!" असे म्हणून केशव तावातावाने चालता झाला.



## : २८ :

यमुनेला काय करावं, कोठे जावं काही सुचेना. तिला सर्व ठिकाणी शून्यवत् वाटत होतं. आपला पति जिवंत आहे याची खात्री तिला अगोदरही होती. परंतु तो विश्वास अप्रत्यक्ष आणि अप्रमाणित होता. आता तिची प्रत्यक्ष खात्रीच झाली होती की विनायकाचें अस्तित्व या जगात आहे. पण त्याचा तपास लावायचा कसा ? ती अस्वस्थ झाली. काय करावें; तिला काहीच सुचेना ! क्षणात ओट्यावर येई अन् पुन्हा आंत जाई. एकदम गजूने येऊन तिचा हात धरला आणि तो म्हणाला, "आई, आज तूं फार उदास दिसते आहेस ग ! सांग ना काय झालं तुला ?"

यमुनेने एकदम त्याला मिठी मारली. ती ढसढसा रडूं लागली. या पूर्वी कधीही ती त्याच्यासमोर रडली नव्हती.

गजूला पण गहींवरून आलं. तो म्हणाला, "आई, रडूं नकोस ना !"

"रडूं नको तर काय करूं गजू ? जीव कसा होतो आहे हें सांगता येत नाही. रडलं की जरा मोकळं वाटतं मनाला ! रडूं दे मला. खूप रडूं दे !"

गजू स्वतःही रडत होता, आणि रडता रडतां तो आपल्या आईचे अश्रू पुशीत होता. पण यमुनेच्या डोळयातून अश्रूंचा पूर एकसारखा वाहातच होता.

गजूने आपलें रडणे एकदम थांबविले. तो म्हणाला, "आई; तूंच म्हणतेस ना की देव जें करतो तें चांगल्याकरिता करतो. मग तूं कां रडतेस ?"

यमुनेने अनेक उपदेशाच्या गोष्टी गजूला सांगितल्या होत्या; पण आज तिचें तिलाच कळत नव्हते. गजू म्हणाला, "आई, मी उद्या शाळेत नाही जाणार. तुझ्याजवळ बसेन. सध्याकाळीं मी जेवणार पण नाही ! तुला बरं वाटत नाही ना ! स्वयंपाक करूं नकोस ! मला पण बरे वाटत नाही."

यमुनेने वर मान करून त्याच्याकडे पाहिले. त्याचे डोळे पाण्याने डबडबले होते. त्याच्या हाताला हात लागताच त्याचे शरीर तिला गरम वाटले. ती म्हणाली, गजू ! तुझ्या अंगात ताप आहे रे !"

"ताप नाही ग आई. तुला रडताना पाहून मला फार वाईट वाटले."

"ताप तर आहे तुझ्या अंगात ! आता इकडे तिकडे भटकूं नकोस उगाच ! चल, खाटेवर आडवा हो. वाऱ्यात बिलकूल हिंडूं नकोस."

"तूं तर अजून रडते आहेस आई ! अशानं माझा ताप वाढेल बरं !" गजू म्हणाला.

"आता कुठं रडते आहे मी ? चल स्वस्थ पड, बोलूं नकोस !"

गजू खाटेवर पडला अन् यमुना त्याचेजवळ त्याचं डोकं चेपीत बसली.



सध्याकाळ झाली होती. ताप उतरल्यामुळे गजू पण खेळायला पळाला होता. यमुना अंगणात येऊन बसली होती. तिला काय करावं, काही सुचत नव्हतं.

इतक्यात रूपा आली. दुःखाच्या दिवसात तिने यमुनेला साथ दिली होती. ती आल्यामुळे यमुनेला जरा बरं वाटलं.

रूपा म्हणाली, "तुम्ही अशा एकट्या बसून राहतां हें चागलं नाही. जरा चार चौघांत मिसळावं म्हणजे दुःख हलकं होतं. केशव असा असेल याची मला कल्पना नव्हती."

यमुना कांहीच बोलली नाही. ती आणखी कोणत्यातरी विचारांत व्यग्र होती.

"सध्या दिवस चांगले दिसत नाही. स्वप्नांत देखील वाटलं नव्हतं तो असं करेल."

"कोणाच्या मनातलं आपण काय जाणणार बाई ! आपलं नशीब फुटकं म्हणून हें असं होतं."

रूपा म्हणाली, "नशीब कसलं ह्यांत ! गजू हरवला होता तेव्हा त्याला शोधायला रात्रींचा दिवस केला होता त्याने ! सर्वांनी त्याला धन्यवाद दिले ! पण काय कल्पना की मनात असं काही काळं बेद्रं असेल !"

यमुनेने भीत भीत विचारले, "काय, केशवबद्दल म्हणतेस तूं ?"

"नाहीतर कुणाबद्दल ?"

"मला वाटलं. रामूच्या बापाबद्दल, मोतीरामबद्दल बोलत असावीस !" यमुना म्हणाली.

रूपाला यमुनेची कीव आली. तिला वाटलं अति दुःखामुळे ही वेडी तर होणार नाही ना !

यमुना सावध होऊन म्हणाली, "काय ऐकलंस तूं केशवबद्दल ?"

रूपा जरा संकोचाने म्हणाली, "फार वाईट गोष्टी आहेत. तुमच्या इस्टेटीची जबरदस्तीने मालकी मिळवायचा प्रयत्न करीत आहे तो. विनायकचे पत्र आले होते तर त्याला परस्परच उत्तर पाठवून दिलं की गजू ··नको बाई ! सागवत देखील नाही ! अशा वाईट गोष्टी लिहिल्या की त्याने येऊंच नाही परत !"

यमुना शात झाली. तिच्या मनांत कोणते विचार आले असतील कोण जाणे ! रूपा पुन्हा म्हणाली, "तुझ्याबद्दलही काही वाईट उठलं आहे. माझा विश्वास नाही बसला त्याच्यावर."

"माझ्या बाबतींत जे ऐकलं ते खरे आहे." यमुनेचे डोळे पाण्याने डबडबले.

रूपा म्हणाली, "भलतेंच ! मला काय ठाऊक नाही तूं कशी आहेस तें !"

"कल्पना नाही तुला ! तूं ज्याची बदनामी ऐकत आहेस त्यानेच मला वाचवले आहे. मी तर खरोखरीच पापी आहे पापी ! चांगली शिक्षा भोगते आहे मी ! आज ते कोठेतरी आजारी आहेत पण त्याची सेवा करायचं भाग्य नाही माझ्या नशिबात ! पाप मी केलं आणि दुःख दुसऱ्याला भोगावं लागतं ! मला जर त्याचा पत्ता असता तर नसते गेले मी धावत ? केशव म्हणाला की पाप केलं की करणाऱ्याला नर्क मिळतो म्हणून ते वाईट नाही. पण त्यामुळे दुसऱ्यालाही त्रास होतो म्हणून ते वाईट आहे. माझ्याच पापामुळे त्याना दूर देशात एकटे राहावं लागत आहे. आज त्याचमुळे केशवला खाली मान घालण्याचा प्रसग आला आहे." तिच्या डोळयातून अश्रु वाहात वाहात गालावर ओघळू लागले.

यमुनेचे भाषण ऐकून रूपाला फार आश्चर्य वाटलं. आजपर्यंत यमुनेवर तिची फार श्रद्धा होती. यमुनेविरुद्ध कोणी काही म्हटलं की तिला खपत नसे. पण आज तिच्या विश्वासाला धक्का बसला होता. कारण ती स्वतःच आपल्याला पापी म्हणत होती. ती मनातल्या मनात म्हणाली "खरंच ! कोणाच्या अंतर्मनाची कल्पना करणं कठीण आहे !"



## : २९ :

राधेनी हाक मारली, "काकी ! अहो काकी !"

आंतून उत्तर आले, "काय आहे राधे ?"

यमुना पटकन बाहेर आली. राधे घाबरून सांगत होता, "रामूने फिर्याद केली आहे काकी !"

"काय ? फिर्याद केली आहे ?"

"रामूला मारत होता गजू ! अर्धमेला केला त्याला !"

"तुम्ही वाचवलं का नाही त्याला ?"

"आम्ही कोणीही त्याच्याजवळ जाऊं शकलो नाही. जो मधे पडायचा त्यालाही मार पडायचा. यात गजूचा पण काही दोष नाही. रामू अगदी मर्मी घाव लागेल अस बोलत होता. उगीच नाही चिडला तो !"

यमुना पुढे जाणार होती. पण राधे काय म्हणतो तें ऐकण्यासाठी ती थांबली. राधे म्हणाला, "गजूला उगीच राग नाही आला. कोणी शिविगाळ केली तर चूपचाप का ऐकावी कोणी ? रामू म्हणत होता मी गावाचा मुख्य आहे. मी जमीनदार आहे. तुमची नांगी माझ्या हातांत आहे. याद राखा. मी अस करेन की तुमचे हाल कुत्रा खाणार नाही."

यमुना म्हणाली, "यात इतकं भाडणासारखं काय होतं ?"

"इतकंच काय पण तो आणखी अचकट विचकट बोलला. ते सागण्यासारखे सुद्धा नाही."

यमुना बाहेर जाणार होती पण ती परत मागे फिरली. थोड्या वेळाने गजू येताना दिसला. कपडे धुळीने माखलेले, हातपाय खरचटलेले, कोपर रक्ताने भरलेले, शर्ट फाटलेला अन् संतापाने चेहरा लाल झालेला असा त्याचा अवतार होता. त्याचा चेहरा काळजीने काळवंडलेला दिसत होता.

गजूला येतांना पाहून यमुनेने ठरविले होते की, त्याला या भांडणाबद्दल कांहीहि बोलायचं नाही; जणूं काही घडलेला प्रकार तिला कळलाच नाही. पण गजूचा संताप पाहून ती पण रागावली अन् म्हणाली, "कितीदा सांगितलं की भांडूं नकोस म्हणून? ऐकत नाही अगदी! तेथे रामूला तूं मारलं, आता येथे मी तुला मारते!"

गजू मुर्दाडासारखा उभा राहिला. तो म्हणाला, "मारून घे किती मारायचं आहे ते! सगळ्याचा मार खायलाच जन्माला आलों आहे मी!"

यमुनेने मारण्याकरिता हात उगारला होता तो तिने मागे घेतला. ती म्हणाली, "तूं रामूला का मारलेस?"

"मारले नाही; अजून मारणार आहे. असं मारीन की पाहात राहाल सारे! फाशीची शिक्षा झाली तरी पर्वा नाही; पण मारल्याशिवाय सोडणार नाही." गजू त्वेषाने बोलत होता.

यमुना थक्क झाली. त्याचा इतका उर्मटपणा तिने कधी पाहिला नव्हता. जरा रागावले की, कोपऱ्यात मुसमुस रडायचा! थोड्या वेळापूर्वी तो असा नव्हता!

ती म्हणाली, "तूं पुन्हा त्याच्याशीं भांडशील?"

"हो! मी त्याला आणखी मारीन!"

"पुष्कळ दिवसात मार खाल्ला नाही म्हणून असं बोलतोस कां?" असें म्हणून यमुनेने त्याला एक थप्पड मारली. गजू जास्त बेडर झाला. या मारण्याचा त्याच्यावर काहीच परिणाम झाला नाही.

आई ही केव्हाच कठोर नसते. ती मुलाला रागावते, मारते पण

त्याचं तिला फार दुःख होतें. त्याचा ताठरपणा पाहून यमुनेने गजूला एकदम पोटाशीं धरले अन् पाठ थोपटीत म्हणाली, "आज झालयं काय रे गजा तुला ?"

थोपडण्याचा परिणाम थप्पडोपेक्षाही जास्त झाला. तो हुंदके देऊन जोरजोराने रडूं लागला. आणि म्हणाला, "मला सोडून दे आई !"

तो तोंडाने सोडून दे म्हणत होता पण तशी कृति मात्र त्याने केली नाही.

"रडूं नको राजा ! चागलीं मुलं कधी कोणाशीं भांडत नाहीत !" यमुना म्हणाली.

"तूं मला कां मारलेंस ? माझी तर काहीच चूक नव्हती" हुंदके देत देत तो म्हणाला.

"तूं रामूला मारलेस ना ? तुझं नि त्याचं पटत नसेल तर सोडून दे त्याची सगत !" ती समजावण्याच्या सुरात म्हणाली.

पुन्हा गजूला जोर चढला. तो म्हणाला, "तो जिथे भेटेल तिथे मी पिटेन त्याला. तो का मला वाईट वाईट बोलतो ? केशव माझे वडील होणार म्हणे ! गजू केशव...असें चिडवतो नेहमी. माझ्या आईबद्दल जर कोणी वाईट बोलले तर जीभच कापून टाकेन मी त्याची."

यमुनेचे डोळे पाण्याने भरून आले. तिच्या डोळयांतील अश्रू सुखाचे होते का दुःखाचे ? सागणे कठीण होतं. तिचे तिलाच कळेना ! तिच्या तोंडातून शब्द फुटेना ! तिने गजूला घट्ट आवळलें. त्याने आईच्या भावना पटकन् ओळखल्या. तो मान वर करून म्हणाला, "आई रडूं नकोस ! तुला कोणी काही म्हटले तर मी आहे ना ? मला कोणाची भीति नाही. बाबा नसले तर मी आहे ना ? केशवकाकानेच ही वाईट बातमी फैलावली आहे. आता मी त्यांना माझ्या घरीं येऊं देणार नाही."



पुष्कळ दिवसानंतरची गोष्ट. गजूचे आणि रामूचे भाडण जुन्यांत जमा झाले होते. मोतीराम पाटलाचा धाक-धपटशा पण पुष्कळ कमी झाला होता. या दृष्टीने जिकडे तिकडे शात होतं. पण यमुनेचं मन कशातच लागत नव्हतं. ती अत्यंत उदास दिसत होती. गजू शाळेत गेला होता. इकडे तिकडे फिरत असताना तिने ठरविले की विहीरीचे पाणी आणावे. दोर आणि बादली घेऊन ती पाणी आणायला निघणार तोच कोणी तरी हाक मारली, "यमुनाबाई आहेत का ?"

हा तर पोस्टमनचा आवाज ! तिच्या पोटात धस्स झालं. सामान खाली ठेऊन ती एकदम बाहेर आली.

"एक पत्र आहे ! बेअरिंग आहे ! दोन आणे पडतील !" पोस्टमन म्हणाला.

"पत्र आहे ?" ती आश्चर्याने म्हणाली. दोन आणेच काय पण, त्यासाठी ती आपली सारी धनदौलत द्यावयास तयार होती.

पत्र देऊन पोस्टमन निघून गेला.

यमुनेचे हातपाय लटलटा कापूं लागले. काय असेल या पत्रात ? तब्येत कशी असेल त्याची ? किती रागावले असतील ते ? येण्याचं तर त्यानी लिहीलं नसेल ना ? पहिल्या पत्राचं उत्तर न देताना सुद्धा त्यानी हें दुसरं पत्र लिहिलं आहे. त्यांची प्रकृति चागली नसेल म्हणून गजूला घेऊन मला बोलावलं तर नसेल ना ! या अन् अशा असख्य प्रश्नानी तिच्या मनांत गोंधळ केला.

गजू शाळेतून केव्हा येतो असे तिला होऊन गेले. आजच तो नेमका उशीरा यायचा नाही तर ! तो येईपर्यंत थाबलेले बरे ! हे पत्र त्याच्याकडूनच वाचून घेईन मी ! दुसऱ्याच क्षणीं तिचा विचार बदलला. ती पत्र घेऊन लगबगीने बाहेर जाताना दिसली.

थोड्या वेळाने जेव्हा ती परतली त्यावेळीं तिच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा उन्माद होता. राधे तिला वाटेंतच भेटला होता. राधेच्या

ओळखीचं अक्षर होतं ते! तो म्हणाला की हें पत्र रामूने यमुनेच्या नांवावर लिहिलेले आहे. हें त्याने गजूच्या वडिलांना लिहिलें होतें. पत्ता ठीक नसल्यामुळे पाठविणाऱ्याकडे ते परत आलें आहे. साऱ्या भानगडीचा उलगडा होतांच यमुना मोतीराम पाटलाकडे गेली होती. पण बरेच दिवसांपासून ते गावात नव्हते.

इतक्यात गजू धांवत आला! तो घोगऱ्या स्वरात म्हणाला, "कुठं आहे ते रामूचं पत्र? दें बरं! मी आत्ताच जाऊन त्याची चागली खबर घेतों."



: ३० :

"वहिनी, आज तोंड गोड करा ! बोला, देता वचन !" केशव म्हणाला.

"कशासाठी ?" यमुनेने आश्चर्याने विचारलें.

"वचन न देता सांगूं ? इतका साधा भोळा नका समजूं ! आधी 'हो' म्हणा, म्हणजे सर्व काही सांगतों."

केशवच्या चेहऱ्यावर प्रसन्नता खेळत होती. यमुनेला ज्या गोष्टीची सर्वांत जास्त उत्सुकता होती, तीच गोष्ट तिच्या मनात प्रथम आली. पण तिला शंका आली; कोणास ठाऊक केशव काय सांगणार आहेत ! ती अत्यंत उदास अंतःकरणाने म्हणाली, "दुसऱ्याचे तोंड गोड करण्याचें भाग्य कुठे आहे माझे !"

केशवला वाटलें की यमुनेच्या मनात अजून त्या पत्राचेंच घोळत आहे. तो म्हणाला, "पत्रासाठी इतके वाईट कशाला वाटून घेता ? मी दुसरंच काही सांगणार आहे. विनायक सदरमधे आला आहे. सायंकाळचे गाडीने येथे येणार आहे."

"आले आहेत ?" हर्षातिरेकाने तिच्याच्याने अधिक बोलवेना. तिच्या डोळ्यांतून अश्रूप्रवाह सुरू झाला.

केशवचें अंतःकरणही भरून आले. तो म्हणाला, "वहिनी, इतके दिवस तुम्ही दुःखांत काढले अन् आता आनंदाची वेळ आली असतांनाही तुम्ही रडत आहांत ?"

बगलेंत दफ्तर घेऊन गजू शाळेंतून येत होता. केशवला घरांत पाहतांच

तो सतापला. कोणाकडे न पाहताच पाय आपटीत तो घरांत शिरला. दफ्तर नेहमीच्या ठिकाणीं न ठेवता ते त्याने ओसरींतच फेकले.

इतक्यात केशव म्हणाला, "ऐकलंस का गजू! आज अशी गंमत सागीन की तुझं तोंड गोड केल्याशिवाय सोडणार नाही मी."

गजूने गुर्श्यांतच त्याच्याकडे पाहिले. तो कांही बोलणार इतक्यात यमुना म्हणाली, "ऐक तर ते काय सांगतां आहेत? ते म्हणतात, तुझे बाबा आज येणार आहेत."

गजूचा या बातमीवर विश्वासच बसेना. तो म्हणाला, "कुठे आहेत ते? थापा मारत असतील!"

यमुनेच्या काळजात धस्स झालं. तिच्या मनात आले, कुठे बोला फुलाला गाठ न पडो!

तो एकदम आईला बिलगला अन् म्हणाला, "आई, कुठे आहेत बाबा? साग ना कुठे आहेत? केव्हा येणार आहेत? कोठून येणार आहेत? पाहा! मी तुला सागितलं नव्हतं का?"

केशव म्हणाला, "माझ्याजवळ ये म्हणजे मी सांगेन सारं!"

केशवबद्दलची त्याच्या मनांतील अढी थोड्या वेळ कमी झाली. तो केशवला जाऊन चिपकला. तो म्हणाला, "सागाना, कुठे आहेत बाबा? मी जाईन आणि त्यांना माझ्याबरोबर घेऊन येईन. आई येईल माझ्या-बरोबर आणि तुम्ही पण या काका! आपण वाजत गाजत आणूं त्यांना!"

काही वेळानंतर ज्या व्यक्तीने विनायकला पाहिलें होते त्या व्यक्तीला घेऊन केशव आला. ती व्यक्ति म्हणाली, "मी जेव्हा तहसील कचेरींतून परत येत होतों, त्यावेळीं विनायक एका टांग्यांतून जात असताना दिसला. त्याच्याबरोबर जयराम व आणखी एक गृहस्थ होता. जयराम नसता तर मी कदाचित् विनायकला ओळखलंही नसतं! मी टांग्याजवळ गेलों तेव्हा त्याने पण मला ओळखले. त्याला जाण्याची घाई होती म्हणून आम्ही कांही विशेष बोलूं शकलों नाही."

संध्याकाळीं गाडीची वेळ होती. इतका वेळ प्रतिक्षा करणे फार कठीण झालं तिला. सारे आयुष्य तिने त्याच्या प्रतिक्षेत काढलें पण आताचा हा थोडा वेळ तिला युगाप्रमाणे वाटला. गजू केव्हाच आपल्या मित्राना घेऊन स्टेशनवर गेला होता. यमुना एकटीच होती घरांत. या एकातांत कितीतरी गोष्टी तिच्या मनांत येत आणि जात. किती दिवसात तिने घर सारवले नव्हते. ते आले तर काय म्हणतील ? त्याना नेहमी नीट नेटके, सारवलेले अंगण आवडते.

तिला आपल्या मामंजीची पण आठवण झाली. ते गेले तव्हा त्यानी गजूला आणि त्याच्या वडिलाना यमुनेच्या स्वाधीन केलं होतं. किती विश्वास होता त्याचा तिच्यावर ! तिला ते घराची लक्ष्मी म्हणत. तिच्या मनांत विचार आला, "मामंजीच्या आशीर्वादाने सर्व कांही ठीक होईल. ते अजून घरीं आले नाहीत तरी काय झालं ? पुढे पुष्कळ आयुष्य आहे ! ते सुखरूप तर आहेत. कोणीतरी डोळयांनी पाहिलं आहेना त्यांना ? जे संकट आलं होतं तें गेलं ! पण मी दुःखात इतकं कां घाबरावं ? माझ्या सासऱ्यानी मला फार मोठा धीर दिला. ते स्वर्गातून आज मला आशीर्वाद देत असतील ! मला भास होत आहे की, त्यानी माझ्या डोक्यावर हात ठेवला आहे.

यावेळीं यमुनेला रडावेसे वाटलें ! या एकातात तिच्याकडे कोणी बसायला येऊन तिचें एकातातील सुख हिरावून घेऊं नये असें तिला वाटलें.



: ३१ :

गाडी आली अन् गेली. जीं दहा बारा माणसे उतरलीं त्यांत विनायक नव्हता. गजूला दुःखापेक्षा लाजच अधिक वाटली. त्याने विचार केला की, इतक्या मित्रात आपण उगाच डांगोरा पिटला; एकटेच आलों असतो तर काय वाईट झालं असतं ? त्याच्या मनांत एक प्रकारचा आनंदच होता. पण वडील न आल्यामुळे त्याला अत्यंत वाईट वाटले. त्याला मोठमोठ्याने रडण्याची इच्छा झाली. परन्तु इतक्या सर्व मित्रासमोर कसे रडावें याचा त्याला प्रश्न पडला.

त्याने बरोबर एक सुंदर फुलाचा हार नेला होता. मोठ्या व्यक्तीचा सन्मान हार घालूनच करतात असे त्याने शाळेत पाहिले होते. त्या हाराचे तुकडे तुकडे करून फेकून द्यावे असे त्याला वाटले.

एक मुलगा म्हणाला, "अरे, त्याच्याजवळ गाडीने यायला पैसे नसतील. पायींच येतील ते."

राघे म्हणाला, "मी सांगितलं होतं की, माझा केशववर विश्वास नाही म्हणून ! तुझ्या घरीं जाण्यासाठी केशवने हें कारस्थान रचलें असावे."

गजू म्हणाला, "शक्य आहे हें !"

गजूने खरं सांगितलं नाही ! त्याचं मन त्याला सागत होतं की आपले वडील दगा देणार नाहीत. तो म्हणाला, "आज मंगळवार आहे. मंगळवारीं घरीं परतून येऊं नये असे म्हणतात ना ! म्हणून ते आले नसतील !"

राघे हंसला आणि म्हणाला, "केशवकाकासारखेच बोलतो आहेस तूं !"

गजू केशवचे नाव निघूं नये याबद्दल काळजी घेत होता; पण राधेने ते नाव काढलेच ! तेथून स्वतःला सावध करण्यासाठी गजूने धूम ठोकली.



केशवला एक विचित्र शंका आली. मोतीराम पाटील कितीतरी दिवसापासून बाहेर गावाला गेले होते. एके दिवशीं केशव त्याला भेटायला गेला असतानाच त्याला ही बातमी कळली होती. त्याच वेळीं त्याचे मनात एक शंका आली होती पण त्याने ती कोणाजवळ बोलून दाखविली नाही. यावेळी पुन्हा त्या शंकेने त्याच्या मनात जोर मारला. अशावेळी स्वस्थ बसणे त्याच्या स्वभावात नव्हते. विचार करीत करीत सदरकडे जाणाऱ्या एका गाडीत तो बसला. रात्रींच त्याने विनायकाचा तपास केला होता पण त्यात त्याला यश आले नव्हते.

दुसऱ्या दिवशी जयरामला शोधायला त्याला फार वेळ लागला. पहिले घर त्याने सोडून दिले होते. केशवला त्याचे नवीन घर सापडले, पण त्यावेळीं तो घरीं नव्हता. पुन्हा त्याचें घरी जात असता त्याला वाटेतच मोतीराम पाटील भेटले. त्याने जोराने हाका मारले, "मोतीराम पाटील; अहो मोतीराम पाटील !"

"काय आहे ! मला आता बिलकूल वेळ नाही ! मग भेटूं आपण !" इतके बोलून मोतीराम पाटलांनी आपला चालण्याचा वेग वाढविला.

केशवने ताडले की तो तोंड लपवीत आहे. दोन शब्द बोलला असता तर काय मोठा उशीर झाला असता. जाऊं द्या ! केव्हाना केव्हा पत्ता लागेलच.

मोतीराम पाटलाचे काम करणाऱ्या वकीलाच्या घरीं केशव येऊन पोंचला. वकीलसाहेब अजून आपल्या बैठकींत आले नव्हते. काही पक्षकार त्याची वाट पाहात आपसात गप्पागोष्टी करीत होते. डेस्कजवळ बसून मुनशी काहीतरी लिहीत होता. नवीन माणूस आलेला पाहून मुनशी म्हणाला, "कसला मुकदमा आहे ?"

केशव म्हणाला, "मुकदमा नाही. मोतीराम पाटलाला भेटायला आलों होतों."

मुनशींनी खाली मान घालूनच उत्तर दिले, "ते इथे नाहीत."

केशव म्हणाला, "इथे आले होते ना ? कुठे गेले ?"

"कोण आलं, कुठे गेले याचा तपशील ठेवायला नाही मी इथे !"

बाकावरील एक पक्षकार म्हणाला, "मुनशीजी का उगाच रागावतात ? नीट का सागत नाही त्याना ?"

मुनशींनी लिहिणं बंद केले आणि म्हणाले, "इथे बसून खर्डेघाशी करावी लागेल तेव्हा कळेल ! आता तुम्ही मुनशीच्या रावण्या कराल, पण पैसे देण्याच्या प्रसग आला तर घासाघीस कराल. काल असाच एक पक्षकार येऊन गेला. सारा दिवस त्याच्या कामात गेला. इकडे फीर, तिकडे फीर. पैशाच्या नावाने शून्य ! पैसे मग देईन म्हणे लिहिण्याचे ! तो नेहमीच असेच करतो. अशानाच आमच्या साहेबासारखे वकील मिळतात. दुसरीकडे गेलं की समजेल ! अशा माणसाचे तुम्ही अगदी सकाळींच नाव घेतले. भगवान करो आणि आपणास जेवावयास मिळो."

पुढचे ऐकण्यासाठी केशव बाकावर बसला.

मधेच एकाने उत्सुकता दाखवीत विचारले, "त्या शेत आणि विहीरीचें झाले का रजिस्ट्रेशन ?"

वकीलसाहेबाना यायला अजून अवकाश होता. मुनशीजी ठसक्यात म्हणाले, "होणार का नाही ? मी होतो ना ! नाहीतर काम बिघडलें असते. एकदा वाटलं कशाला इतका त्रास घ्यावा ! पण पुन्हा वाटलं, अस करूं नये आपण. पण केलं झालं त्याचं काम ! आपण मदत करायची नाही तर कोणी करायची ?"

"सर्व काही पक्कं झालं ?"

"कोणत्या खटल्याची गोष्ट आहे ?" एकाने मधेच विचारले.

दुसरा म्हणाला, "आजकाल कर्ज घेणारे लोक सावकाराच्या डोळ्यात धूळ फेकूं पाहतात. विनायक नावाच्या एका माणसाने मोतीराम

पाटलाकडून कर्ज घेतलं होत. यानंतर तो माणूस गाव सोडून चालला गेला. बरींच वर्षे लोटलीं. मोतीरामने त्याच्या बायकोजवळ तगादा लावला. पण आजकाल ऐकतं कोण ? त्या बाईने मग एकाशीं पाट लावला. तिला एक दहा बारा वर्षांचा मुलगा आहे. त्या बाईची हुषारी तर पाहा ! लग्न लावले दुसऱ्याशीं आणि पहिल्या नवऱ्याच्या शेतावर अन् विहीरीवर आपला हक्क सांगू लागली. कायदे रोज रोज बदलले जातात ! त्यामुळे मोतीराम पाटील काही करूं शकले नाहीत. खूप दिवसांनी त्याना समजले की विनायक जिवंत आहे म्हणून ! ते लागलीच त्या ठिकाणी गेले. विनायक घरी परतणार होताच. याच्यापूर्वी तो फार अडचणींत होता. आपल्या पत्नीची भानगड ऐकून त्याला फार वाईट वाटले. त्याने कर्जफेडीचा करारनामा तेथेच लिहून दिला. मोतीराम पाटलाना वाटलें की, नुसता लेखी करारनामा काय उपयोगाचा ? ते त्याला काल गावांत घेऊन आले अन् सारं काही रजिस्ट्रेशन करून घेतलं. विनायकाला घरच्या भानगडी ऐकून घरची इतकी चीड निर्माण झाली की, त्याने पुन्हा घरीं तोंड दाखवावयाचे नाही असे ठरविले. काम झाल्या-बरोबर तो येथून लवकरच गेला. मोतीराम पाटलानी जर इतकी हुषारी दाखविली नसती तर त्याचे पैसे बुडलेच असते. हल्ली कोणावरही भरवंसा राहिला नाही !"

"सारं खोटं ! साफ खोटं !" केशव एकदम ओरडला.

"खोटं कस ? ह्या साऱ्या गोष्टी काल वकीलसाहेबासमोर झाल्या बाबा !"

"वकीलसाहेबासमोर झाल्या म्हणून काय झालं ? ते मोठे देव लागून गेले जसे काही !" केशव सतापून सांगू लागला.

"कोण आहांत तुम्ही ? इतक्या उर्मटपणाने कां बोलता आहात तुम्ही ?" मुनशी म्हणाले.

"हा उर्मटपणा नाही महाराज ! हें सत्य आहे ! विकट सत्य आहे ! माझं नांव केशव आहे !"

"आ ! केशव ?" दोघे तिघे आश्चर्याने म्हणाले. मुनशी पण मानभावीपणाने हसले.

"हो ! मीच केशव ! त्या बाईने दुसरे लग्न केले नाही. तिच्या बाबतींत बुद्धिपुरस्सर वाटेल त्या बातम्या उठवल्या गेल्या आहेत. तिला फसवलं आहे सर्वांनी !" केशव जोरजोऱ्याने सागूं लागला.

"खोटं असेल, धोका दिला असेल, फसवलं असेल तर कोर्ट कचेरी आहे ना ! इथे कशाला ओरडता अन् घसा कोरडा करता ?" मुनशी म्हणाले. "हें वकीलसाहेबाचे ऑफीस आहे. येथे शातपणाने बोलावे लागते."

बाकावर बसलेला एक अनुभवी पक्षकार सहानुभूतीच्या स्वरात म्हणाला, "अरे बाबा ! कशाला कोर्ट अन् कचेरी करून वकीलाचे घर भरता ? शहाण्याने कोर्टाची पायरी चढूं नये अस म्हणतात. आता आपल्या बायकोला आणि मुलाला घेऊन काही कामधंदा करा अन् सुखाने राहा ! आतापर्यंत तुम्ही शेतीचा आणि विहीरीचा भरपूर फायदा घेतला ना ! आता त्या मोतीराम पाटलावर का चिडता ?"

केशव म्हणाला, "तो मुलगा विनायकाचा आहे. या सर्व प्रकारात फार फसवा-फसवी झाली आहे. मी स्वतः वकीलसाहेबाना भेटणार आहे."

मुनशी म्हणाले, "हा मुद्दा चागला आहे. कोर्टात जर सिद्ध झालं की, मुलगा विनायकाचा आहे तर मुकदमा रंगेल चागला ! शेत आणि विहीर कदाचित् तुम्हाला मिळूं शकेल ? पण आमचे वकीलसाहेब तुमचा हा मामला चालवूं शकणार नाहीत. तुम्ही दुसरे वकील पाहा !"

केशवने कोर्टात जाऊन तपास केला. विनायक खरोखरीच शेत नि विहीरीचें विक्रीपत्र करून दुसरीकडे कुठे निघून गेल्याचे त्याला समजलें.

## : ३२ :

एक दोन दिवसांत कोर्टातील बेलीफ येऊन शेतावर आणि विहीरी-वर ताबा घेणार अशी बातमी यमुनेला समजली.

यमुनेच्या दृष्टीने ही बातमी विशेष महत्त्वपूर्ण नव्हती. भाद्रपद महिन्यांत आकाशात दिसणाऱ्या एक दोन ताऱ्यावर जर ढगांनी आपली सत्ता गाजविली तर त्याचेकडे कोणाचेही लक्ष जात नाही. ते प्रकाशित राहो अथवा न राहो, त्याबद्दल रात्रीला काहीच वाटत नाही. त्याच-प्रमाणे यमुनेने सुद्धा ती बातमी ऐकली.

इकडे गजू तापाने अंथरूणावर पडला होता. यमुनेला खूप जागरणे झालीं. ताप वाढला की गजू झोपेत बरळत असे. रामू आणि केशव याचींच नावे तो बरळत असे. यामुळे गजूच्या आजारीपणांत केशव कोणतीही मदत करूं शकला नव्हता.

पति येऊन परतून गेला; आणि तोही आपल्याला न दिसतांना नि न भेटताना ! याचे दुःख यमुनेला भयंकर झाले. या आपत्तिनंतर लगेच गजू आजारी पडला. संकटामागून संकटे येत असतात. याला कांहीतरी अर्थ असेलच ना !

गजूचा ताप आता उतरला होता. पथ्यपाणी चालूच होतं. हळूहळू तो आवारात खेळूं लागला होता.

त्याने आईला म्हटलं, "आई, लोक म्हणतात की अजून विहीर आणि शेत आपल्या ताब्यात राहूं शकतं. कोर्टात जाऊन मला फक्त अर्ज करायला हवा."

यमुना म्हणाली, "गजू तुला हें कांही अजून समजत नाही. तूं अशा गोष्टींचा विचार न करणे हेच उत्तम."

"मला कळत नाही तर काय झालं? माझ्याबरोबर वकील राहतील, तूं राहशील!"

यमुना कांहीच बोलत नाही हें पाहून तो पुन्हा म्हणाला, "आई, सर्व लोक म्हणतात की, आपल्याला खूप फसवलं आहे मोतीराम पाटलानी!"

यमुना मधेच म्हणाली, "गजा रे, मी तुला सारं कांही समजावून सांगेन; तूं नुकताच आजारातून उठला आहेस. त्या गोष्टीबद्दल विचारच करूं नको सध्या!"

"पुन्हा कुठे वेळ आहे आई? बेलीफ तर लवकर येणार आहे ना!" गजू म्हणाला.

"आल्यावर पाहू त्याला. आता तुझं औषध वगैरे घेऊन येते मी."

आजकाल गजूला भूक चांगली लागत होती. औषधपाण्यामुळे विषय आपोआपच बदलला गेला.

यमुना सध्याकाळीं काही कामानिमित्ताने बाहेर निघाली होती. न कळत तिचे पाय तिच्या शेताकडे वळले. तेथे सारें काही तसेंच होते. तीच विहीर, तीच पायवाट, ते आंब्याचें झाड, जाणारे येणारे लोक, सर्व कांही जसेच्या तसें होते. सध्याकाळ काही नेहमीपेक्षा विशेष काळवंडलेली वाटली नाही किंवा नेहमीपेक्षा हवेत काही विशेष उष्मा नव्हता. निसर्गावर कोणत्याही प्रकारचा परिणाम झालेला दिसत नव्हता. दुनियेत काय चाललं आहे हें निसर्गाला जणूं काय माहीत नव्हतं!

शून्य अंतःकरणाने यमुना इकडे तिकडे फिरत होती. थोड्या वेळाने ती विहीरीपाशीं आली. त्या विहीरीच्या काठावर बसण्याची तिला इच्छा झाली नाही. नंतर ती आंब्याच्या वृक्षाखाली येऊन उभी राहिली. तिला गतस्मृति आठवल्या. या आंब्याच्या झाडाला तिने खत पाणी घालून मोठें केले होतें. तें झाड पण आता तिचें राहिलें नव्हतें.

ती बेचैन झाली. तिला ग्लानी आली. तिच्या डोळयांसमोर काजवे चमकूं लागले. ती शेतातल्या एका झाडाला टेकून बसली. तिला वाटलं या ठिकाणी मनसोक्त रडून घ्यावं. घरीं गजूसमोर मनसोक्तहि रडता येत नाही.

सध्याकाळ सपून रात्रीच्या अंधारास सुरवात झाली होती. बाजूच्या पायरस्त्यावरून काही मुले समूह गीत गात जात होते. गाण्याचे सूर हळूहळू ऐकूं येईनासे झाले. ते स्वर यमुनेच्या हृदयात जाऊन भिडले.

यमुनेला इथे बसून किती वेळ झाला होता कोणास ठाऊक ! ती अस्वस्थ झाली होती. ती इकडे तिकडे फिरत होती.

"आई, कुठे आहेस तूं ?" या स्वराने ती भानावर आली. तिला आश्चर्य वाटलं गजूला पाहून ! ती जोऱ्याने म्हणाली, "मी येथे आहे रे गजू ! तूं इतक्या अशक्तपणात येथे कशाला आलास रे !"

दोघेही पुढे सरकले. "माझा राजा" म्हणून यमुनेने त्याला आपल्या बाहूपाशांत घेतले. ती म्हणाली,"तुला अंधारांत भीति नाही वाटली ? मी आता निघणारच होते घरीं यायला ! तूं कसं ओळखलंस की मी येथे आहे म्हणून !"

गजू म्हणाला, "मी ओळखलं की तूं इथेच असशील. मला बरं वाटलं नाही म्हणून मी येथे आलों." तो पुढे म्हणाला, "आई, मी तुला खूप त्रास देतों ना ! आता देणार नाही. तूं माझ्यावर रागावूं नकोस बरं !"

"नाही रे माझ्या राजा ! तूं नाही त्रास देत. तुझ्यासाठीच तर मी जगतें आहे." ती पुढे बोलूं शकली नाही. तिचा स्वर दाटला. फक्त डोळयांतून ओघळणारा प्रत्येक अश्रु त्याच्यावरील तिचें गाढ प्रेम व्यक्त करीत होता.

खरोखरच मी तुला फार त्रास देतों ! पण तूं त्याचे काहीच वाटून घेत नाही. आणखी दुसरं कोणी असतं तर मला खूप मारून

ठिकाणावर आणलं असतं. मी आता तुला त्रास देणार नाही. मी ठरवून टाकलं आहे." गजू म्हणाला.

"काय ठरवलं आहेस रे ?"

"हेंच कीं, मी बाबा, बाबा म्हणून त्याची फार आठवण करतो, पण ते फार फार वाईट आहेत. स्वतः वाईट गोष्टी करून जेलमधे जाऊन आले आणि तुला बिचारीला किती दुःखात टाकलं !"

त्याचे हे शब्द ऐकून यमुना आश्चर्यचकित झाली. त्याचे शब्द तिच्या हृदयात जाऊन भिडले.

गजू म्हणाला, "आई मी मुळीच वाईट वाटून घेणार नाही आता ! कोणी काय म्हणेल त्याची भीति नाही मला ! आई, तूं आता हें घर सोडून दे. आपण केशव काकाच्या घरी आनंदानें तरी राहूं ! या घरात तुला सारखं सारखं रडावं लागतं ना ! मी आता आपल्या बाबांना 'बाबा' च म्हणणार नाही." तो बोलत होता.

यमुनेच्या चेहऱ्यावर अभिमानाची छटा चमकली. माझ्याकरिता किती मोटा विचार करतो आहे हा ! किती मोटं मन आहे याचं ! माझाच मुलगा आहेना तो !

ती विचार करूं लागली.

"आई, एक गोष्ट ऐकशील माझी ?"

"कसं खुळ्यासारखं बोलतो आहेस रे !"

खुळ्यासारखं काय होतं यात ! एकटा गजूच का खुळ्यासारखं बोलतो आहे ? यमुना सुद्धा त्या निष्पाप गजूच्या गोष्टीबद्दल विचार करीत होती. सर्व मोटमोटीं माणस आपल्याला हुषार नि समजूतदार समजून सुद्धा लहान मुलांसारखेंच वागतात ना ! गजूच्या कितीतरी गोष्टींची यमुनेला आठवण झाली. गजूने सुद्धा आपल्यासाठी किती दुःख सोसलं ! त्या बालमनाने निष्पाप अन् निःपक्षपाताने न्याय दिला होता. त्यालाही जगाच्या अन्यायाची चीड आली होती; वीट आला होता.

पण यमुनेच्या अंतःकरणांत एक दिव्य ज्योति प्रदीप्त झाली होती. अंतर्मनाचे संकेत तिला मार्गदर्शन करीत होते. ती उठली, तिने अश्रू पुसले आणि तिने गजूचा हात धरला. ती म्हणाली, "गजू, असं बोलूं नये राजा ! आपण जरी केशवकाकांच्या घरीं गेलों तरी तुझे बाबा ते तुझेच राहतील ! ते तुझे जन्मदाते वडील आहेत. असा सताप करून कसं चालेल ! तूं फार गोष्टी सहन केल्या आहेत तरी पण आणखी पुष्कळ सहन केलं पाहिजे. तूं जितकं सहन करशील तितका तूं मोठा होशील ! तुला अजून जगात पुष्कळ गोष्टी शिकावयाच्या आहेत."

गजूचा हात धरून ती उठून उभी राहिली. आकाशात ढग गोळा झाले होते. जिकडे तिकडे काळाकुट्ट अंधार होता. कुठं काहीच दिसत नव्हतं. तरी सुद्धा ती आपल्या मुलाचा हात धरून पुढे पुढे जात होती. चिरंतन दुःखात विलीन झालेली ती भारतीय स्त्री—नारी—दुःख आणि विपत्तीच्या अंधःकारमय पथाला पददलीत करीत अनंत कालासाठी वाट चालूं लागली. तिला आता कशाचीच भीति नव्हती; चिंता नव्हती. जिकडे तिकडे भयाण अंधःकार होता तरी ती आपल्या एकुलत्या एक नि आवडत्या मुलाचा हात धरून सतत चालत होती; पुढे पाऊल टाकीत होती.